॥ ॐ श्री सद्गुरु समर्थ ॥

शारदाश्रममाळा

( पुष्प ९ वें )

# श्रीविष्णुदासांची कविता

## खंड २ रा

संपादकः—

नरहर सदाशिव जोशी उर्फ खरशीकर शास्त्री



शके १८५८ ) ( सन १९३७

किंमत १॥ रुपया

नरहर सदाशिव जोशी उर्फ
खरशीकर शास्त्री
खरशी, पो० पांचगणी जि० सातारा

प्रकाशक:—
संस्थापक:—शारदाश्रम, यवतमाळ

मुद्रक:—
म. कृ कुरकुरे
'विदर्भ' छापखाना अमरावती

॥ ॐ श्रीसद्गुरु समर्थ ॥

# श्रीविष्णुदासांची कविता

## खंड २ रा.



### अनुक्रमणिका



## पदांची अनुक्रमणिका.

# पदांची अकारविल्हे सूची

ॐ श्री सद्गुरु समर्थ

# —* संपादकाचें हृद्गत *—

श्रीमत्सद्गुरु परमहंस परिव्राजकाचार्य १००८ श्रीपुरुषोत्तमानंद सरस्वति उर्फ श्रीविष्णुदास कवि महाराज श्रीक्षेत्र माहूर यांच्या कवितेचा दुसरा खंड प्रसिद्ध करण्याचें भाग्य लाभलें ही त्यांचीच कृपा होय.

कवितेचा पहिला भाग शके १८४९ (सन १९२८) त सुप्रसिद्ध विद्वान श्री. यशवंत खुशाल देशपांडे एम्. ए. एलएल्. बी. वकील व श्री. दत्तात्रय बापूजी महाजन बी. ए. या महोदयांनीं शारदाश्रम, यवतमाळ या संस्थेमार्फत प्रसिद्ध केला. त्यावेळच्या अपरिहार्य अडचणीमुळें माझ्यावरील ओझें या विद्वद्वर्यांनीं घेतलें याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहे.

## कवितेची प्रसिद्धि

श्रीविष्णुदास महाराजांना कविता छापण्याची इच्छा बऱ्याच दिवसापूर्वीची होती, हें त्यांच्या उपलब्ध झालेल्या पत्रांवरून समजतें. त्यांचे बंधु श्रीगुरुदास महाराज उर्फ अनंतराव मामा यांनी सातारा येथें 'बाळामृत' प्रेसमध्यें हातानें लिहून शिळाप्रसवर 'श्रीविष्णुकविकृत पदें' या नांवाचें शके १८१२ चे सुमारास सुमारे ५० पदें, अष्टकें, आरत्यांचें लहानसें पुस्तक छापलें होतें, त्यापुस्तकास कृष्णाजी रावजी धांदरफळे उर्फ विष्णुदास कवि यांचीच प्रस्तावना आहे. पण हें छापलेलें पुस्तक मलाही समजलें नव्हतें. श्रीगुरुदास मामा हे माझे सख्खे मातुल असून त्यांच्या हयातींत त्यांच्याकडून मला हें पुस्तक पाहण्यास मिळालें नव्हतें. गेल्या दोन वर्षांपूर्वी उमरखेड येथील माझे गुरुबंधु श्री. दादा बेदरकर यांनीं तें पुस्तक मला दाखविलें. पुस्तक पाहतांच मला फारच आनंद वाटला. पुस्तकांतील सुंदर छापील अक्षर गुरुदास मामांचेंच आहे. हें दुर्मिळ पुस्तक मजजवळ ठेवण्यास दिलें हे दादाबेदरकरांचे फारच उपकार आहेत.

शके १८३९ त महाराजांचे समाधिनंतर श्रीपुरुषोत्तमानंद स्वामी माहूर, यांचें चरित्र हा लेख ता. १०।२।१९१८ च इंदुप्रकाशांत मी प्रसिद्ध केला. त्या लेखाधारे श्री. वामन नारायण देशपांडे या सरस्वति भक्तानें ' माहूरचे विष्णुकवि ' हा लेख मुमुक्षूंत प्रसिद्ध केला. तद्‌नंतर नांदेडच्या आख्यानरत्नमालेंत व मुमुक्षूंत महाराजांचें बभ्रुवाहनाख्यानास गद्याचा पोषाख घालून मीं प्रसिद्ध केलें होतें. नंतर कवितेचा १ ला खंड शके १८४८ त श्री. देशपांडे व महाजन यांनीं प्रकाशित केला. शके १८५० मध्यें ' श्रीविष्णुकवि महाराजांचे चरित्र ' हें पुस्तक मीं मुमुक्षूंतून प्रसिद्ध करून स्वतंत्र पुस्तकें छापविलीं. व आतां हा दुसरा खंड प्रसिद्ध होण्याचें भाग्य लाभत आहे. मधून मधून मुमुक्षूंतूनही त्यांची कविता संतवाङ्मयभक्त श्री. पांगारकर हे छापीत असत. कविता प्रसिद्ध होण्यास श्री. पांगारकर महाराज यांचे मुमुक्षूचा फार उपयोग झाला होता. त्यांची कविता प्रसिद्ध होण्यापूर्वी गोमांतकापर्यंत पसरल्याचें पहिल्या भागाचे निवेदनांत श्री. देशपांडे लिहितात. मीही पंचवीस वर्षामागे रत्नागिरी जिल्ह्यांत विष्णुकविकृत सीताहरणाख्यानांतील ' फिरनिवनी सीता मजसंगें फार श्रमली ' वगैरे पदें ऐकिलीं होतीं. ही कविता वऱ्हाड, मध्यप्रांत, निजामस्टेट वगैरेकडे पुष्कळ पसरली होती हें श्री. दातारसाहेबांचें लेखावरून ध्यानांत येईलच.

कविता भक्तिप्रेमानें कशी रसरसलेली आहे याचें विवेचन याच पुस्तकांतील अन्यत्र महाशयांच्या लेखावरून दिसून येईल. त्यांचीं सृष्टिसौंदर्य वर्णनें, उपमा अलंकारादि सरस असून कविता प्रासादिक आहे. हें वाचकांनीं त्यांच्या १ ल्या खंडाच्या केलेल्या परामर्षावरून दिसून येईल.

पहिल्या भागाची आज मितीस एकही प्रति शिल्लक राहिली नाहीं. इतका आदर त्या पुस्तकाचा झालेला पाहून आनंद कां वाटणार नाहीं ? अद्याप त्या पुस्तकास पुष्कळ मागणी आहे. व आतां या खंडाचें चीज झालें म्हणजे पहिला खंड लवकरच छापण्यास घ्यावयाचा आहे. याखंडांत पूर्वीचे खंडांत न छापलेली कविता घेतली आहे. ही कविता मिळविण्यास किती श्रम व खर्च झाला असेल तें लिहून दाख-

विष्यांत स्वारस्य नाहीं. तें माझें कर्तव्यच होतें. पण त्यासाठीं मला बराच शोध करावा लागला होता. माझे गुरुबंधु श्रीगुरुभक्त नानासाहेब आमीन वकील, मोर्शी, यांनीं लिहून ठेवलेल्या कवितेचा फारच उपयोग झाला. शिवाय अप्रकाशित कविता काढून त्याचे वर्गीकरण करणें वगैरे कार्य बरेच अडचणीचें होतें कारण कविता वऱ्हाड व मोगलाईत, माझे राहणें सातारा जिल्ह्यांत, छापण्याची योजना यवतमाळ येथील शारदाश्रमार्फत व छापखाना उमरावतींत अशा अडचणीचे स्थितींत कविता प्रसिद्ध होत आहे.

श्रीविष्णुकवींची अद्यापही बरीच कविता अप्रकाशित असावी. खानदेशांतील साधुवर्य श्री. बाळानंद महाराज दुसखेडकर यांचें आशीर्वाद चरित्राचे ५ अध्याय त्यांनी लिहिले आहेत. तो ग्रंथ श्रीबाळानंदांचे गृहस्थ ह. भ. प. रामकृष्णबोवा यांजजवळ आहे. माहूरचे दत्तशिखरचे महंत ब्र. संतोषभारती यांचेही काव्यमय चरित्र केल्याचें समजतें. शिवाय पोवाडे, पदें आख्यानें वगैरे कोठें व किती पडून राहिलीं असतील हें समजणें शक्य नाहीं.

## पुढील ग्रंथाची रूपरेषा

श्रीविष्णुकवी महाराजांनीं रचलेलीं आख्यानें फारच रसाळ आहेत. तीं सर्व छापलीं तर ४०० पृष्ठांचें तरी पुस्तक होईलसें वाटतें. तेव्हां आख्यानें अगोदर छापावी की पहिला खंड अगोदर छापावा याजबद्दल आमच्या मंडळांत योजना सुरू आहेत. जसजसा लोकाश्रय मिळेल तसतशी सर्व कविता प्रसिद्ध होईल. श्रीविष्णुकवीकृत प्रकाशित व अप्रकाशित ७५ लावण्यांचें पुस्तक लवकरच छापून वाचकांचे हातीं येईल त्यासाठीं लागणारा खर्च श्री. महाजन तहशीलदार यांनीं देण्याचे वचन दिलें आहे. श्रीविष्णुदास महाराजांची समग्र कविता प्रसिद्ध झाली म्हणजे श्रीगुरुदासमहाराजांच्या उत्कृष्ट कविता व गद्य प्रसिद्ध करण्याकडे वळणार आहे. तेथपर्यंत जराव्याधी वगैरेपासून संरक्षून सर्व इच्छा पूर्ण करणार श्रीसद्गुरुसमर्थ आहेत.

महाराजांनीं स्वहस्ते लिहिलेली कविता ज्या ज्या भक्तगणांनीं नेली ती प्रसाद म्हणून त्यात्या भक्तांच्या घरीं राहिली ! यामुळें कवितेचे पाठ कोणते खरे हें समजण्यास मार्ग नव्हता. कित्येक ठिकाणीं ३।३ पाठभेद झाले आहेत. नमूना म्हणून या खंडांत पृ. १३४ यांत ' लाऊनि घेशी उगिकां उपाध्याधि ' ना ' ची ' याचे तीन पाठदाखविले आहेत. तसेंच पृ. १५२ यांत ' खचित वेणुके ' सांग येवढें ' याचे ही पाठभेद दाखविले आहेत. निरनिराळ्या म्हणणाऱ्यांचे तोंडीं निरनिराळे पाठ पाहून खरा पाठ काय याचा भ्रम होणें सहज आहे. या कामीं हैद्राबाद येथील पूज्यवर श्री. व्यंकटराव दातार बी. ए. डेप्युटी फायनन्सिअल सेक्रेटरी यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून मला साह्य केलें. याबद्दल त्यांचा उतराई होणें शक्य नाहीं. शिवाय मठांतील नुकतेच समाधिस्थ झालेले श्रीभार्गवानंद सरस्वतिस्वामी यांनीही महाराजांचे पाठ कोणते होते हे बरेच दाखविले होते. या छापील पुस्तकाचीं १५० पृष्ठें स्वामींनीं पाहिलीं होतीं, पुढील पुस्तक पाहण्यास स्वामी राहिले नाहींत या बद्दल वाईट वाटते. या स्वामींनीं मठाची व्यवस्था उत्तम ठेविली होती. त्यांच्यासारखे आजन्म गुरुसेवाधारी अत्यंत दुर्मिळ आहेत.

श्रीविष्णुकवी महाराजांच्या घराण्यांतील श्री. काशिनाथ गणेश भांदरफळे, रिटायर्ड डेप्युटी कलेक्टर यांनीं आपल्या पत्नी कैलासवासी सौभाग्यवती पार्वतीबाई यांच्या स्मारकार्थ म्हणून याखंडाचे प्रकाशनास आर्थिक सहाय्य केलें आहे. त्यांचे मदतीमुळेंच हा खंड प्रकाशित करतां आला. त्यांनीं आपला व सौ. पार्वतीबाईंचा फोटो पुस्तकांत घालण्यास संमति दिली, याबद्दल त्यांचे आभार कसे व्यक्त करावेत हें माझ्या शक्तीबाहेरचें कार्य आहे.

पुस्तकास आपुलकीचे भावानें प्रस्तावना लिहिणारे श्री. य. खु. देशपांडे यांचे तर मजवर फार उपकार आहेत. या पुस्तकास कायावाचामनें करून त्यांचे अतीशय साह्य झालें आहे. तसेंच पुरस्कार लिहिणारे सन्मित्र श्री. पांगारकर महाराज यांचा मी फार ऋणी आहे. श्री. व्यंकटराव बाबासाहेब दातार, यांनीं आदरपूर्वक लिहिण्याबद्दल त्यांचा फार आभारी आहे.

प्रुफें तपासण्याचे अवघड काम माझे मित्र श्री. नारायण भूमय्या जवादिवार एम्. ए. एल्. टी. अमरावती येथील श्रीदत्तसेवा मंडळाचे उपाध्यक्ष व सेवक यांनी उत्तम केलें आहे. त्यांचेवर कृपा करणार श्रीसद्गुरुसमर्थ आहेत यापेक्षां जास्त लिहवत नाहीं. बंधुवर्य अंबादास पंत अनसिंगकर यांनीही प्रेसकाची पाहून कांहीं सूचना केल्या हें लिहिण्यास मला सादर अभिमान वाटतो.

शारदाश्रम, यवतमाळ या संस्थेनें प्रकाशनाचें कार्य केलें आहे. शारदाश्रमाचे चिटणीस श्री. पु. गो. देशपांडे व संस्थापक य. खु. देशपांडे यांचे साह्यानें पुस्तक प्रकाशित होत आहे. शारदाश्रमाचें कार्य उत्तरोत्तर वाढते राहील अशी कृपा करणार श्रीसद्गुरु समर्थ आहेत. विदर्भ प्रेसचे चालक श्री. कुरकुरे हे आमच्याशी फार सौजन्याने वागले, याबद्दल त्यांचा आभारी आहे. श्रीसद्गुरुनाथांच्या भांडारांतील भक्तिज्ञान वैराग्य, उपदेश, करुण, वात्सल्य, मातृप्रेम वगैरे रसभरित प्रसादपर अमोल ठेवा वाङ्मयप्रेमी यांचेसाठीं उघडा करून ठेविला आहे. ज्यास ज्या रसाचे वाटेल त्या रसाचें पोटभर सेवन करून या माझ्या सद्गुरुप्रीत्यर्थ झालेल्या सेवेनें तृप्तीचे ढेकर देवोत, अशी प्रार्थना श्रीसद्गुरुमाउलीकडे करून करून ही लेखरुप सेवा समर्पित करतो.

श्रीरथसप्तमी
शके १८५८
धातृ नामसंवत्सरे

श्रीसद्गुरु सेवक,
**नरहर सदाशिव जोशी**
उर्फ
**खरशीकर शास्त्री**
( रा. खरशी; पो. पांचगणी;
जि. सातारा )

# श्री विष्णुदासांची कविता

## भाग दुसरा

## — ❀ प्रस्तावना ❀ —

—— o ——

श्री विष्णुदास कवि उर्फ पुरुषोत्तमानन्द सरस्वति यांच्या कवितांचा हा दुसरा भाग महाराजांचे शिष्य आणि भागिनेय श्री. नरहर शास्त्री खरशीकर हे प्रकाशित करीत आहेत. त्यांच्याच सूचनेवरून मी ही प्रस्तावना लेख लिहीत आहे.

महाराजांच्या कवितांचा पहिला भाग सन १९२८ मध्ये श्री. द. बा. महाजन यांच्या सहकार्याने आम्ही शारदाश्रमातर्फे प्रकाशित केला होता. त्या ग्रन्थास विदर्भांतील सुप्रसिद्ध विद्वान साहित्यप्रेमी कै. अच्युत सीताराम साठे एम्. ए. एल् एल् बी. हे प्रस्तावना लेखक लाभले होते. हा द्वितीय भाग प्रकाशित झालेला पहावयास ते हयात नाहीत याबद्दल वाईट वाटते. त्यांच्याच करवीं हा पद्यकुसुमगुच्छ रसिकांसमोर आला असता तर त्या पद्यसुमनांचा सुगंध अधिक उत्साहानें उपभोगावयास मिळाला असता.

श्री विष्णुदासांचे चरित्र श्री. नरहरशास्त्री खरशीकर यांच्या शब्दांतच प्रथम भागात दिले आहे. याशिवाय त्या कवींचें विस्तृत चरित्र त्यांनीं प्रेमळ वाणीने स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रकाशित केले आहे. त्यावरून वाचकांच्या लक्षांत येईल की प्रस्तुतकवी विद्यमान कालांतील असले तरी महाराष्ट्रांत प्राचीनकालापासून जे संतकवी निर्माण झाले आहेत त्यांच्या परंपरेतील ते आहेत. तेव्हां रसिक वाचकांनी या कवींच्या कृतीकडे त्याच दृष्टीने पहावयास पाहिजे. या कवींच्या कृतीत त्यांना व्युत्पन्न कवींच्या कृतींत दिसून येणारी भाषाशुद्धता, व्याकरण, साहित्य इत्यादि शास्त्रांनीं उत्पन्न झालेला रेखीवपणा दिसून येणार नाही पण या कवीच्या कृतींत अंत:करणापासून निघालेले अनुभवाचे बोल आढळून येतील. सगुणभक्तीचा ओलावा तींत रसास्वादयास मिळेल. तींत मातृहृदयाची कोमलता आणि बालमनाचा हट्ट दिसून येईल. तींत संसारार्तजीवास कैवल्यसुखाचा मार्ग सांपडेल, तींत जन्मजात

कवीची नवनवोन्मेषिणी प्रतिभा, आणि वाग्गंगेचा सरस आणि अखंड असा ओघ पहावयास मिळेल. सारांश या काव्यगंगेत मनसोक्त विहार करणाऱ्या सहृदय रसिकास अननुभूत अशा शांतिसुखाचा लाभ होईल. मात्र यातील पदोपदी आढळून येणारे वृत्तदोष, यतिभंग, व्याकरणाशुद्धि इत्यादि निरुपद्रवी मीनांस उग्र नक्र मानून जर या काव्यगंगेस स्पर्शही करण्याचे नाकारलें तर तींत असलेल्या सुमधुर आणि सुरसतीर्थास आणि तिच्या पोटीं असलेल्या भाव, गुणयुक्त विविध रत्नांस आपण मुकूं हें निश्चित समजावें.

कवितांच्या प्रथमभागांत आलेल्या चरित्रावरून दिसून येईल कीं, श्री विष्णुदासांचा जन्म सातारा येथें स. १८४४ मध्यें चांदरफळे उपनांवाच्या माध्यंदिनीय ब्राह्मणकुळांत झाला. १२ व्या वर्षी लग्न झालें. वयाच्या १८ व्या वर्षी नुकतीच यौवनांत पदार्पण करणारी पत्नी आणि मातापिता बंधुगण यांनी भरलेलें गृह इत्यादिकांचा कोणास न कळत त्यांनी त्याग केला. दोनवर्षे क्षेत्रोपक्षेत्रीं परिभ्रमण करून वयाच्या विसाव्या वर्षी ते माहूर क्षेत्रास आले. तेथें १६ वर्षे राहिल्यावर श्री विष्णुदास आपल्या मेहुण्याच्य अचानक दृष्टीस पडले व घरच्या मंडळीस शोध लागला. १८ वर्षे पति विरहित जीवन व्यतीत केल्यावर विष्णुदासांच्या पत्नीचे पतीशी पुनर्मीलन झालें. माहूर येथें १४ वर्षे संसार केल्यावर सन १८९२ मध्यें पत्नीचा अंत झाला. व श्री. विष्णुदास हे वयाच्या ४८ व्या वर्षी संसार बंधांतून मुक्त झाले. सन १९०१ मध्यें वयाच्या ५७ वे वर्षी संन्यास दीक्षा घेतली आणि स. १९०७ मध्यें श्रीरेणुकादेवीच्या चरणापाशीं मातृतीर्थावर मठ-स्थापना केली आणि वयाच्या ७३ वे वर्षी स. १९१७ मध्ये त्यांनी समाधि घेऊन इहलोकची यात्रा संपविली. यावरून दिसून येईल कीं, वयाच्या केवळ प्रथमची १८ वर्षे सातारा येथे जन्मस्थानीं घालवून जवळ-जवळ सुमारे ५५ वर्षांचा काळ श्रीक्षेत्रमाहूर येथे आणि त्याच्या परिसरांत घाल-विला, म्हणजे सातारा ही केवळ जन्मभूमि असून माहूर हीच विष्णु-दासांची कर्मभूमि अथवा कार्यक्षेत्र होतें.

विष्णुदासांचा जन्म झाला तेव्हां सातान्यास छत्रपतिच्या घराण्यांतील शेवटच्या पुरुष गादीवर होता. त्या वेळीं अधुनिक शिक्षण पद्धतीचा तेथें गंधही नव्हता. तेव्हा विष्णुदासांचे शिक्षण म्हणजे संध्या, पुरुषसूक्त इत्यादि गृहस्थाश्रमास आवश्यक अशा नित्यकर्मांची संथा आणि मराठी लेखन वाचन येवढ्या पुरतेंच झाले. त्या काळच्या पद्धतीप्रमाणें वयाच्या बाराव्या वर्षी लग्नाची बेडी पायांत पडून वयाच्या सतराव्या वर्षी संसारवृक्षाची कटु-फळे चाखावयास प्रारंभ करणाराचा पुरोगामी जीवितक्रम कांहीं अपूर्व होईल अशी अपेक्षा नव्हती. तथापि विष्णुदासांची बालवयांतील ईश्वरभक्तिकडील ओढा व संसारातील अनासक्ति यामुळेंच त्यांना मातापिता बन्धु आणि प्रेमळ पत्नि यांचा पाश तोडून विलास प्रिय अशा तारुण्याच्या आरंभींच गृहत्याग आणि देशत्याग करावयास लाविला. दोन वर्षांचा तीर्थोपतर्थी कष्टतर प्रवास आणि चौदा वर्षे माहूर क्षेत्राच्या पुण्यभूमीमधील तपानुष्ठान आणि भगवदाराधना यांच्या योगानें स्वत:चा उद्धार करून अन्यांस ही मार्गदर्शक होणारी संत पदवी विष्णुदासांस प्राप्त झाली.

बासर येथील सरस्वतिच्या मंदिरांत विष्णुदासांना देवीच्या कृपेनें काव्य स्फूर्ती झाल्याचें आणि तेथेंच त्यानीं सरस्वति दत्तांची आरती केल्याचे चरित्रकार वर्णितात. माहूर क्षेत्रीं आल्यानंतर मातापुरवासिनी श्रीरेणुका देवी विष्णुदासांनी आपलें उपास्य दैवत मानिलें. पुष्कळशी त्यांची कविता आपल्या उपास्य दैवताच्या स्तुतिपर आहे. तरी संसाराचा त्याग करी पर्यंतची बुवांची काव्य रचना विविध प्रकारची आहे. दत्तात्रय, शिव, राम, कृष्ण इत्यादि दैवतांच्या उपासकांना उपयोगी पडणारी कविता म्हणजे भूपाळ्या, स्तोत्रें, आरत्या, अष्टकें पदें वगैरे होत. कीर्तनकारांस उपयुक्त अशीं विविध आख्यानें, निवृत्तिपर आणि प्रवृत्तिपर अर्थ लावतां येईल अशा शृंगारपर लावण्या, उपदेशपर पदें, चरित्रपर आणि प्रासंगिक स्फुटपदें पोवाडे आणि कटाव इत्यादि बरेंच कविता भांडार आहे. विष्णुदासांनीं स्वतंत्र असे काव्य प्रबंध रचिल्याचें आढळून येत नाहींत.

कवीच्या चरित्राच्या वर दिलेल्या आढाव्यावरून स्पष्ट दिसून येईल कीं त्यांना जी काव्यस्फूर्ति झाली ती स्वयंप्रेरित असून ती काव्य, वृत्त, अलंकार, रस इत्यादि शास्त्राच्या परिशीलनानें झालेल्या प्ररणेचें फळ नाहीं. आपल्या उपास्य देवतेच्या करुणापूर्ण वाणीनें केलेल्या स्फूर्तितोषानें कवीनें काव्य रचनेस आरंभ केला आहे. त्यामुळें उत्कट भक्ति प्रेमानें ओथंबलेली अशी कविता दिसून येते. काव्य शास्त्राचा अभ्यास कवीने केला नसला तरी पुराणेतिहासाशीं कवीचा परिचय दृढ दिसतो. विशेषतः भागवताचें परिशीलन बरेंच झालेलें दृष्टोत्पत्तीस येतें. उत्कृष्ट काव्याचा आगमाच्या साहित्याची कवीस उत्तम जाणीव होती हे त्यांनीं केलेल्या शारदा स्तवन-पर ओव्यांतून कळून येते. वरील स्तवन पहिल्या भागांत आलें आहे. तो एक उत्कृष्ट काव्याचा नमूना म्हणून दाखवितां येईल ' कला लतिका, ज्ञान: गंगा, शृंगार श्री सर्वांगसंगी, साहित्य आलिंगनाचें शिखर, विशाल नदी नर्मदा, प्रमेय पातालाची गंगा, नवरसांची मंदाकिनी, अर्थखाणी, पांडित्यदानें सुखकारिणी इत्यादि जी शारदेचीं विशेषणें शारदा स्तवनांत आलीं ती काव्य आणि उत्कृष्ट काव्य निर्मितीस प्रोत्साहक नाहींत असें कोण म्हणेल !

रेणुकादेवी संबंधीं जी काव्य रचना कवीनें केली आहे ती वात्सल्य रसानें अगदीं ओतप्रोत भरलेली आहे. तीचें प्रेम, मातृहृदय, पुत्रवात्सल्य, बालमनाचे विविधतरंग, बालकाचा हट्ट इत्यादि मायेचें रसानें किती तरी प्रेमळ भाव सहज रीतीनें वर्णिलें आहेत. वत्सलता हा भक्तिरसाचा गाभा आहे-हें कवीनें उत्तम रीतीनें आपल्या या देवी संबंधीच्या काव्यांत दाखवून दिलें आहे. सेव्य सेवक भावापेक्षा माता पुत्र संबंध हा उच्च दर्जाचा असल्यामुळे कवीनें स्वतःकडे पुत्राची भूमिका घेऊन आणि श्रीरेणुका देवीस मातृस्थानीं कल्पून तिला विविध प्रकारानें आळविलें आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, तुकारामादि विख्यात संत कवींनीं आपल्या उपास्य देवते संबंधानें हाच माता पुत्र भाव कल्पून उपासना केली आहे. श्रीविष्णुदासाच्या काव्यांत तो भाव फार उत्कटतेनें रंगविला आहे. प्रस्तुत भागांत देवीचीं ३९ पदें दिली

असून शिवाय आरत्या अष्टकें आणि शिवाय देवीच्या स्तुतिपर वसंततिलका आर्या, कामदा आणि साकया अशी स्वतंत्र प्रकरणें प्रकाशित केली आहेत. या नंतर दत्ताची, शंकराची श्रीरामाची आणि कृष्णाची स्वतंत्र पदें दिलीं आहेत. त्याच्या पुढें गुरु विषयींचीं पदें देऊन नंतर उपदेशपर पद्यें आलीं आहेत. विविध देवतेच्या आरत्या आणि नंतर अष्टकें दिलीं आहेत. यापुढें जन्म आणि पाळणे दिल्यावर एकंदर वृत्तांत स्वतंत्र अशीं भक्ति॰ पर स्फुट प्रकरणें दिलीं आहेत

प्रस्तुत कवीच्या भाषेसंबंधानें कै. अच्युतराव साठे यांनीं पहिल्याभागाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे, " भाषा अति गोड, साधी, व सुबोध आणि खेड्यापाड्यांत लोकांच्या तोंडीं जी निसर्ग सुंदर परंपरागत भाषा नित्य वसलेली असते ती या पदांतून जागाजाग आल्यानें कानालाही पद फार मधुर वाटतात. श्रोते तर तल्लीन होतच असतील, पण वक्ता देखील आपल्या स्वच्छ व प्रशांत काव्य स्रोताकडे पाहून क्षणभर दंग होत असेल यांत शंका नाहीं. " हें किती समर्पक आहे. याचा अनुभव कविता वाचतांना अथवा ऐकतांना येईल. कवीची भाषा नित्य व्यवहारांतील असून सहज सुंदर आणि ओघवती आहे. तींत प्रसाद गुण ओतप्रोत भरलेला असून थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ साठविण्याची कवीची हातोटी अवर्णनीय आहे कवीनें योजिलेले दृष्टांत आणि उपमा अगदीं व्यवहारांतील असून अर्थ पूर्ण आणि मांडलेल्या सिद्धांतास स्पष्ट करणारे असे आहेत. ते ओढून ताणून आणलेले नसून सहज ओघांत असे आलेले आहेत. कवीची प्रतिभा उच्च दर्जाची असून त्यांनीं मांडलेल्या कल्पना अगदीं नावीन्यपूर्ण आहेत कविता वाचणाराचें अथवा ऐकणाऱ्याचें अंतःकरण त्यांत इतकें रंगून जातें कीं या कवीच्या काव्यांत पदोपदीं आढळून येणारे वृत्तदोष, व्याकरण दुष्टता यतिभंग इत्यादि काव्यदोषाकडे त्याचें [illegible] जात नाहीं.

प्रस्तुतकवीच्या काव्यांत दिसू[illegible] दोष काढून टाकण्याचा संपादकांनी यत्किंचित् ही प्रयत्न [illegible] हें [illegible] केलें असे आम्हास

वाटते. हे दोष नाहींसे करतांना पदांची फिरवा फिरव, शब्दांची अदला-बदल, क्वचित्प्रसंगीं वाक्यांचीही उलटा पालट करावी लागली असती. त्यामुळें काव्याचें मूळ स्वारस्य नाहींसे होऊन कवीचा अन्याय केल्याचें पातक माथीं येण्याचा संभव असतो; त्यापेक्षां आहे त्या मूळ स्वरूपांतच काव्य प्रकाशित करून कवींचे हृद्गत मूळस्वरुपांत रसिक वाचकांपुढे ठवणें शतपटीनें बरें, असेंच सूज्ञ वाचक कबूल करतील.

प्रस्तुत भागांत सरस आणि हृदयंगम स्थळें इतकीं विपुल आहेत, कीं तीं प्रस्तावनेंत देऊन जागा न अडवितां तीं शोधून काढून त्यांचा आस्वाद घेण्याचें सहृदय वाचकावर सोपविणेंच चांगलें. प्रस्तुत कवीची कविता इतकी लोकप्रीय आहे, कीं, ती एकदा ऐकल्यावर उतरून घेण्याचा मोह होतो आणि अशारीतीनें भजनी मंडळीमध्यें विशिष्ट देवतांच्या भक्तांमध्यें, हरिदास पुराणिकांमध्यें इतकेंच नव्हे तर नर्तक गायकांमध्येंही या कवितांचा फार प्रसार आहे. वऱ्हाडचा कांही भाग आणि निजामचा मराठी प्रांत यामध्यें तर या कवितांचा प्रसार इतका झाला आहे कीं, ' कृष्णा माझा छंद सारा आतां सोड सोडरे ' इत्यादि पदें शेतकरी लोकं शेतांत काम करतांना गुणगुणतांना दृष्टीस पडतात.

या कवीच्या काव्याची लोकप्रीयता इतकी आहे कीं, पहिला भाग छापल्यावर लवकरच तो खलास झाला आणि त्या भागाची मागणी इतकी आहे कीं, लवकरच दुसरी आवृत्ति प्रकाशकांना काढावी लागेल. हें या कवितांच्या लोकप्रियतेचें उत्कृष्ठ द्योतक आहे. याच कारणानें उत्साहित होऊन संपादकांनीं हा दुसरा भाग प्रकाशित करण्याचें हातीं घेतलें आहे. महाराष्ट्रांतील भक्तिप्रधान रसिक जनता या दुसऱ्या भागाचा पहिल्या भागाप्रमाणेंच प्रेमपूर्वक स्वीकार करतील आणि संपादकास श्रीविष्णुदासांचा उर्वरित कवितासंग्रह प्रसिध्द करण्यास उत्तेजन देईल असा आम्हांस भरंवसा आहे.

या संतकवीच्या काव्यास प्रस्तावना लिहून सेवा करण्याची संपादकांनी संधि दिली याबद्दल आभार मानून ही प्रस्तावना लेख संपवितो. इतिशम्.

माघ शु॰ ५ शके १८५८
ता. १५-२-३७.
यवतमाळ

यशवंत खुशाल देशपांडे



सुप्रसिद्ध श्रीसंत वाङ्मयनिष्ठ ह. भ. प. ल. रा. पांगारकर बी. ए. यांचा

# पुरस्कार.

अर्वाचीन काळातले विख्यात संतकवि 'विष्णुदास' यांच्या कवितेचा हा दुसरा भाग आज वाचकांच्या हातीं पडत आहे. विष्णुदासांची कविता पूर्वीच वऱ्हाडांत पुष्कळांच्या तोंडीं बसलेली आहे. त्यांचे व त्यांच्या कवितेचे भक्त शकडो आहेत तथापि यांचें चरित्र व त्यांची कविता सर्व मराठी वाचकांच्या हातीं देण्याचें श्रेय त्यांचे भाचे व सच्छिष्य वे. शा. सं. नरहरिशास्त्री खरशीकर यांनीं जोडलें आहे. त्यांनीं विष्णुदासांचें चरित्र व काहीं कविता प्रथम आमच्या 'मुमुक्षु' मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध केली व नंतर ती वाचकांना आवडल्यावें आढळून आल्यावर पुस्तकरूपनें छापून काढण्याची त्यांना कित्येक रसिकांनीं सूचना केली. विष्णुदास हे अर्वाचीन काळांतले कवि असले तरी मोठे अधिकारी सत्पुरुष होते. साताराप्रांतीं जन्मून त्यांना वऱ्हाडांतील प्रसिद्ध माहूर उर्फ मातापूर क्षेत्रीं घोरतर अनुष्ठान केलें व 'रेणुकाआईचा' प्रसाद जोडला. वऱ्हाडांतच त्यांनीं आपलें आयुष्य व्यतीत केलें, तेथील लोकांना परमार्थ मार्गाला लावलें व माहूरच्या पायथ्याशींच त्यांनीं समाधि घेतली. ते मोठे साक्षात्कारी सद्गुरु होते. विष्णुदास हे अत्यंत प्रेमळ भक्त असून उत्तम कवि आहेत. काव्यरसिकांनाही त्यांची कविता मान डोलायला लावते. त्यांची भाषा प्रासादिक आहे. भाविकांना तशीच विद्वानांना ती रमविणारी आहे. नागपूर

युनिव्हर्सिटीनें कॉलेजांतील मराठी घेणाऱ्या विद्यार्थ्यांना त्यांच्या कवितेचे भाग अभ्यासार्थ नेमावेत अशी सूचना विद्वानांनीही मान्य होणारी आहे.

भेटी सकळांची घ्यावी । मुक्ती सकळांसी द्यावी ।
आले भक्त तुझिया गांवीं । कृपा व्हावी ह्मणोनी ॥

अशी त्यांनी रेणुकादेवीची प्रार्थना केली आहे. त्यावरून स्वतःच कृतार्थ होऊन न बसतां लोकांचा उद्धार व्हावा अशी त्यांची उदारवृत्ति आहे. त्यांची उपास्यदेवता रेणुकादेवी ही असल्यामुळें बरीचशीं पदें वगैरे देवीच्या स्तुतिपर आहेत. त्यांतील करुणरस हृदयाला हालविणारा आहे. त्यांची भाषा इतकी साधी, प्रेमळ, सहज व प्रासादिक आहे कीं त्यांची कविता पुनः पुन्हा वाचावी व त्यांच्या भावनेशीं तन्मय व्हावें असें वाटते.

सखे धांवुनि ये गडे । नेई झांकुनि लुगडें ।
ठेऊं नको मज उघडें । माझे आई रेणुके ! ॥

तळमळींत प्रेमसुख भोगण्याची त्यांची हातोटी मोठी आल्हादक आहे. पद १० व १३ उत्कृष्ट आहेत. देवी, दत्त, राम, कृष्ण यावरील अभंग, पदें, दिंड्या, उपदेशपर, आरत्या, श्लोक, अष्टकें वगैरे विविधवृत्तांतही यांची सारीच कविता अत्यंत प्रेमळ आहे.

कोणी सन्निध या विपत्तित कदा येती न बापा ! खरें
वृक्षीं पत्रफुलें फळें तंववरी लोळंगती पांखरें ॥

ह्या दत्ताष्टकांतील श्लोकार्थ किती सत्य आहे बरें !

मोठ्यावरीच बहुधा अइनें रुसावें
अंकीं लहान मुल घेउनियां बसावें ।
मोठे पहात बसतें दुर यद्यपी तें
मांडीवरीच लघुबालक दुग्ध पीतें ॥

कामदा, वसंततिलका, आर्या, साकया या वृत्तांतील यमकें पाहतां कवीच्या वाणीवर मोरोपंती छाया दिसते, तथापि यांचीं कित्येक यमकें अभिनव, स्वतंत्र व सुंदर आहेत.

विष्णुकवीची कविता सर्व महाराष्ट्रभर लोकप्रिय व्हावी अशी आहे. ती अनुभविक भक्ताची साधांभोळी वाणी आहे.

नाशीक क्षेत्र
ज्येष्ठी पौर्णिमा, शके १८५८ } लक्ष्मण रामचद्र पांगारकर

॥ श्री गुरु प्रसन्न ॥

# श्री पुरुषोत्तम महाप्रसाद

श्रीमत् परमहंस श्रीपुरुषोत्तमानंद सरस्वती उर्फ विष्णुदास महाराज आधुनिक कालीन महान अनुभवी व साक्षात्कारी सर्वविख्यात सत्पुरुष होत. ते स्वतः म्हणतात :— 'होवुनी ब्रह्म स्वरूपाची । मी जिव झालो महाबलवान, गुरुकृपा बळानी' ( पृ. ११ ) यावरून हें उघड आहे की, ब्रह्मानुभवानंतर सगुणभक्तीवर यांची बैठक असे. व हीच बैठक श्री ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, समर्थरामदास, निरंजन रघुनाथ इत्यादि प्राचीन संतांची होय.

लहानपणापासून यांच्या प्रासादिक कविता हरिदास गोंधळी यांचे मुखातून ऐकण्यास येत, तेव्हां तेव्हां असें वाटे की, समग्र कविता एकत्र होऊन वाचावयास मिळेल तर मोठें भाग्य उदयास येईल. परंतु पहिल्यापासून या सत्पुरुषाच्या कवितेची अशी स्थिति होती की, ही कविता अथवा जे लिखाण ज्याचे जवळ असे त्याचे पासून हातोहातीं प्रसार होत असे. देवानान्य प्रासादिक कवितेचें मुख्य लक्षण हें आहे की ते जाहिराती शिवाय सर्वत्र फैलावतें. सुयोगानें कृपामूर्ति ह. भ. प. नरहरशास्त्री खरसीकर यांचे परिश्रमानें यापूर्वी श्री पुरुषोत्तमानंद सरस्वती स्वामी उर्फ विष्णुदास महाराज यांच्या कवितेचा पहिला भाग व चरित्र छापून प्रसिद्ध झालें. आतां त्यांच्याच प्रयत्नाने फक्त हा दुसरा भाग उदयास येत आहे.

अद्याप त्यांचीं रसाळ आख्यानें अप्रकाशित आहेत. कांहीं जुन्या हरिदासांचे मुखांतुन पैकं आख्यानें ऐकूं येतात. त्यांची संख्या किती आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. तीं छापून प्रकाशित होतील तो भाग्याचा दिवस होईल.

ब्रह्मानंदाचे श्रेष्ठ बैठकीवर बसून जगदंबेच्या प्रत्यक्ष सान्निध्यांत जें कवित्व स्फुरलें, त्या काव्याकडे भाषा व्याकरणादि दृष्टीनें पाहणें हें बालिशपण होय. कारण त्यांचें काव्य घोकपाठ नसून केवळ प्रासादिक आहे.

श्री विष्णुदासांना श्री जगन्माता जगदंबेचा सगुणसाक्षात्कार होता हें त्यांचेच सहजोद्गारावरून सिद्ध आहे. पृ. २३ ( पद नं. २० , यांतील ' ऐसें हीं दोन झालीं वर महिने आकरा । तरि अझुनी भेट नाहीं, आईची लेकरा ॥ व पृ. २९ ( अभंग ४२ ) यांतील ' माझी रेणुका माउली । कल्पवृक्षाची साउली ॥ हाके सरशी घाईघाई । वेगें धांवतची पायीं ॥ आलीं लावण्य उन्हांत ॥ नाहीं आळस मनांत ॥ खालीं बैस घे आराम । मुखावरतीं आला घाम ॥ विष्णुदास आदरानें । वारा घाली पदरानें ॥ व पृ. १५७ ( कादंबा ५१ ) यांतील ' प्रगटली महानंदि राजसा । दिनमणी भला उदित जसा ' ॥ आणखी ही असेच उद्गार कवितेंत आहेत.

त्यांच्या कवितेंत प्रेमाचे अनेक तरंग आहेत. अनंत तऱ्हेनें त्यांनी प्रभूस आळविलें आहे. श्रीविष्णुदास श्रीरेणुका जगदंबेशीं बोलतात ते असे.—पृ. ११ यांत ' तूंचि गुरु आर

माय आजी । यज्ञ दान व्रत जप तप तर्पण संध्या तूंचि माझी ॥ आवडिनें सुपारी घे माझी । जशी विदुराची कणी भक्षिली द्रौप-दीची माजी ॥ अक्षरें तीन रेणुका ही । वदनीं वदतों मंत्र तंत्र जप नये आणिक कांहीं ' ॥ पृ. ९५ ( अष्टक ११८ ) यांत ' ह्मणे ना बाई ये, जवळ तिपिलिके शर्करा । ह्मणेना अंगासी मर्दन मला केशर करा ॥ तसें बुध्या येणें, मज तुजकडे भाग पडलें । अगाई रेणुके ! मजविण तुझें काय अडलें ! । २६ अशा तऱ्हेनें आईकडे मीच गेलें पाहिजे असा भाव व्यक्त करतात ता पृ. २४ ( पद नं. ३१ ) समजवाई ! आई मुलावेण लटका ॥ यांत ' विन आइ होशील कुणीकडे पडशील । वावरशील की एकटी कीं, ॥ असें विनवून मातेला ही मुलांकडे प्रेमानेंच पाहणें अवश्य आहे असें ह्मणतात, दोहींबाजूनें पाहिलें तर मातृ-प्रेमच व्यक्त होत आहे.

यापेक्षां जास्त उदाहरणें देण्यापेक्षां हा समग्र ग्रंथ वाचकांनीं वाचून आनंद भोगावा. श्रीस्वामींच्या चित्ताशीं समरस होऊन जे कोणी भाग्यवान हें काव्य वाचतील त्यांना जगदंबा प्रत्यक्ष होईल. आणि त्यांस भक्तिप्रेमाचा महाप्रसाद जगदंबेकडून सहज होईल, अशा योग्यतेचें हें काव्य आहे.

अनुदास

श्रीराम ९ — शके १८५८

व्यंकटेश माधव दातार

रिटायर्ड अ० फायनान्सिअल सेक्रेटरी

हैद्राबाद.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | शेवटची | काळ | काल ३० |
| ६ | २ | त्या | या |
| | ३ | या | त्या |
| ११ | १५ | येईल | येईन. |
| | १८ | द्यावयासि | घ्यावयासि |
| १६ | ६ | आई | बाई |
| २३ | ३ | कवळा | कवळी |
| ३३ | १ | अभंग दत्ताचे | अभंग श्रीदत्ताचे |
| ३५ | १७ | ५१ | ५१ अ |
| ४२ | २ | प्रेमें प्रेमादर | प्रेमादर प्रेमें |
| ४३ | ३ | तुझिया | तुझि या |
| ४४ | १० | दुग्ध | दुग्धा |
| ५१ | १ | पदें श्रीकृष्णाचीं | संकीर्ण पदें |
| ५५ | २१ | बोलाविले | बोळाविलें |
| ५७ | २२ | करुणाघन | विसरूनि |
| ६३ | १४ | रमामंडित | रणमंडित |
| ६७ | ५ | अपक्षा | अपरोक्षा |
| ७० | २२ | आत्मा | आत्म |
| ७१ | १५ | भासिले | त्रासिले |
| ८४ | १९ | निर्वाणि | निर्वाणि |
| ८८ | ५ | निव | निवती |
| ९५ | १५ | किती | कशी |
| ९६ | १० | एक्य | एक्या |
| १०० | ६ | स्वापत्या | आनाथा (पा०) |

श्रीमत्परमहंस श्रीपुरुषोत्तमानंद सरस्वति उर्फ

# श्रीविष्णुदास कवि महाराज, माहूर.



( गृहस्थाश्रमांत )

जन्म शके १७६६ समाधि शके १८३९

श्री० काशिनाथ गणेश धांद्रफळे बी. ए.
माजी डे. कलेक्टर सातारा



जन्म मार्गशीर्ष शु. १५ शके १७८६

कै. सौ. पार्वतीबाई धांद्रफळे



जन्म ज्येष्ठ शु. १ श. १८१५ निधन श्रावण शु १४ श. १८५५

ॐ श्रीसद्गुरुसमर्थ

# विष्णुदासांची कविता

—✻ ॐ ✻—

## भाग २ रा



## नमन

—✻ ॐ ✻—

### १ पद गणपतीचें

दयाळा नमन तुला गजवदना ॥ धृ० ॥

तूं गणनायक सिद्धिविनायक, वरदायक सुखसदना ।
संपूजित प्रिय चतुरानन, पंचानन, मधुसुदना ॥ १ ॥
चिंतिति तुज सुर नर नारायण, विघ्न निवारण रणकदना ।
विघ्नारण्या तोडि वरेण्या, शरण शरण्या दिनरदना ॥ २ ॥
सांप्रत कृष्णापूर[1] निवासा, हृदयविलासा निज निधना ।
विष्णुदासा अभय समर्पुनि, समजावी या दिनरुदना ॥ ३ ॥

ॐ । ॐ ।। ॐ ।।।

---

१ हें गांव पुसद जि. यवतमाळ पो. ढाणकीचे जवळ आहे.

## २ पद गणपतीचें

नमोऽस्तुते श्रीगजवदना ॥ संकटहरणा, विश्वंभरणा,
करि करुणा तूं ये ये सुखसदना ॥ धृ० ॥
कृपानिधे वरदे शुभरदना। सद्गुणगहना, षड्रिपुहनना,
मंगलभुवना। लंबोदर हर गौरीनंदना ॥ करि करुणा तूं ॥१॥
गुणार्णवा, पूर्णाश्रय सर्वा। मस्तकिं दुर्वा, सुंदर मर्वा।
मंदिल हिरवा। पांत पितांबर कनकाभरणा। करि करुणा तूं ॥२॥
विशारदा वरदानि गणेशा। परमपरेशा प्रभुसर्वेशा
जय जगदीशा। दे दर्शन मज विघ्ननाशना। करि करुणा तूं ॥३॥
विनायका ऐका निजजनका। प्रियकरपात्रा, परमपवित्रा
विविध चरित्रा। विष्णुदास ह्मणे पुरवि वासना ॥करि करुणा तूं॥४॥

ॐ ॐ ॐ

# श्रीरेणुकेची प्रार्थना

## २ सवाल ( ओव्या )

—*ॐ*—

श्रीमन्मंगलदायके। श्रीमूळपीठनायके ॥
माझी विनंति आयके। माझे आई रेणुके ॥ १ ॥
नारायणी श्रीशंकरे। अन्नपूर्णे विश्वंभरे ॥
कृपा करणें हेंचि बरें। माझे आई रेणुके ॥ २ ॥
माया ममता वाढवी। पुत्रापरी लाडवी ॥

दुःखापासुनी सोडवी । माझे आई रेणुके ॥ ३ ॥
भूमंडळीं या वासरा । तुझ्या वांचुनी दुसरा ॥
पह्य पह्य नसे आसरा । माझे आई रेणुके ॥ ४ ॥
सखे ! धांवुनि ये गडे । नेई झांकुनि लुगडें ॥
ठेऊं नको मज उघडें । माझे आई रेणुके ॥ ५ ॥
गंभीर गुण चांगले । वेद वर्णितां भागले ॥
तुझें ध्यानाचि लागलें । माझे आई रेणुके ॥ ६ ॥
पदारविंद पाहुं दे । सदा सद्‌गुण गाऊं दे ॥
सदा सन्निध्र राहुं दे । माझे आई रेणुके ॥ ७ ॥
परमानंदें डोलणें । स्नेहधर्मानें चालणें ।
आतां किती ह्यो बोलणें । माझे आई रेणुके ॥ ८ ॥
अंबे ! सांगणें इतुकें । प्रेमें प्रेमाचें भातुकें ॥
देवोनि तोषवीं कौतुकें । माझे आई रेणुके ॥ ९ ॥
आतां कुरंगडोळसे । पाजुनियां पाडसें ॥
निद्रा करीं ह्यो राजसे । माझे आई रेणुके ॥ १० ॥
वेगें मला भेट देई । तुझ्या लागतों मी पायीं ॥
विष्णुदास ह्मणे बाई । माझे आई रेणुके ॥ ११ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ४ भूपाळी ( शिवराम[१] स्वामीची )

उठाजी स्वामी मुनिवर्या, महाराज ज्ञानसूर्या ।
पह्य जगत्रयाच्या कार्या, गुरुराया शिवरामा ॥१॥

१ हे स्वामी उमरखेड येथील चिन्मयानन्द मठाचे अधिपति होते. हे चिन्मयानंदापासून चवथे पुरुष असून त्यांचा काल वर्षांपूर्वी झाला.

स्वामी शिवरामचंद्रा, उठा सांडूनिया निद्रा ।
भेटीसाठीं इंद्र–चंद्रा, ध्यान मुद्रा लागली ॥२॥
गण गंधर्वांच्या थाटी, आले देव तेहतिस कोटी ।
ऋषी भूपाळांची मोठी, झाली दाटी गुरुराया ॥३॥
मंगळमूर्ती गणपती, ऋद्धि सिद्धि सरस्वती
कृष्णा वेण्या भागीरथी, भोगावती नर्मदा ॥४॥
लक्ष्मी सावित्री पार्वती, लोपामुद्रा अरुंधती ।
सीता द्रौपदी दमयंती, महासती अनसूया ॥५॥
जपी तपी ब्रह्मचारी, वानप्रस्थ सदाचारी ।
सहा अठरा आणि चारी, करिती द्वारीं गर्जना ॥६॥
टाळ मृदंग वाजती, जंत्रें चौघडे गर्जती ।
गाती गायन नाचती, देवांगना आनंदें ॥७॥
रत्नजडित सिंहासन, पद्मदर्भ कृष्णाजिन ।
वरी बैसुन भवभंजन, ज्ञानांजन घालावें ॥८॥
भेटी सकळांची घ्यावी, मुक्ति सकळांसी द्यावी ।
आले भक्त तुझिया गांवीं, कृपा व्हावी ह्मणोनी ॥९॥
विष्णुस्वामी ह्मणे भावें । सद्गुरुचे गुण गावे ।
भक्तिप्रेम दान द्यावें । प्रसन्न व्हावें महाराजा ॥१०॥

ॐ ॐ ॐ



# पदें

—* ॐ *—

## पदें श्रीदेवीचीं

५ पद ( चाल श्रीविधि हरिहर )

आइ जगदंबे । तुला रेणुके । माझि दया यावी ।
प्रपंच खोटा फासेपारधी, मोठा मायावी ॥ धृ० ॥
याच अरण्यामधें चोरटें, चहुंकडुनि उठले ।
परिपाठाच्या वाटा मोडुन, कैकाला लुटले ।
कइकांचे गळे कापुनि गिळिले, कैकांचे खटले ।
काका काका पणजे अजोबा, बाबाही आटले ।
परंतु याचें पोट भरेना, मोठा खायावी ॥ प्रपंच० १ ॥
विकल्पना वासना अशा घरबुडव्याच्या रांडा ।
इक्षूदंडापरी खावया लाविति एरंडा ।
विश्वामित्रासहि गुंगविलें, मारुनि मुकुंडा ।
साठ सहस्र वर्षांचें घातलें पुण्य मुत्रकुंडा ।
मग अज्ञानी इतर जनांची, काय दशा व्हावी ॥ प्रपंच० २ ॥
ब्रह्मज्ञानी षट्शास्त्रांचीं, धुंडाळिति तिपडें
भीष्मादिक शरपंजरीं पडले, विर उपडे तिपडे ।
जटा वाढवुनि मठांत बसले, बदलुनियां रुपडें ।
कित्येक काळे हिरवे भगवे, रंगविती कपडे ।

परंतु त्यासीं बळेंचि ओढी, गाळें लावुनि दावीं ॥ प्रपंच० ३॥
त्या रामानें पहा निःक्षत्रिय, पृथ्वीतळ केला ।
या रामानें रावण वधिला, जाउनि लंकेला ।
हिरण्यकश्यपु विदारूनि नर,—हरिनें जिंकियला ।
महिषासुर मर्दिला तुम्हाही, प्रताप ऐकियला ।
परंतु शत्रू आजिंक्य पडला, ह्या अमुच्या डावीं ॥ प्रपंच० ४ ॥
या दुष्टानें फासे मांडिले, पहा रस्तोरस्तीं ।
तुजकडे येतां बळें मार्गामधें, करि दंगामस्ती ।
हा कमजास्ती बोलुं देइना, केवढि जबरदस्ती ।
सुस्ति नको करूं सत्वर याची, करि बंदोबस्ती ।
विष्णुदास ह्मणे शरण आलों तुज, चरणकमल दावी ॥ प्रपंच० ५ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ६ पद

असं ह्मणुं नको बाई । रेणुके ! ॥ धृ० ॥
खचित सांगतें तुला नव्हे मी, दीनाची आई ॥ रेणुके० १ ॥
रे, चांडाळा दुर हो लागूं, नको मज सहसाही ॥ रेणुके० २ ॥
रे, पापिष्ठा तूं नको सहसा, पडुं माझ्या पायीं ॥ रेणुके० ३ ॥
रोग तुझा असाध्य आतां मी याला करूं कायी ॥ रेणुके० ४ ॥
नको करूं कटकट कपाळ कुटकुट, उठ कुणिकडे जाई॥रेणुके० ५॥
विष्णुदासासह नाव बुडो या, भवसागर डोहीं ॥ रेणुके० ६ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ७ पद ( झंपा )

आतां तुझ्या धरीन पदरास ॥ धृ० ॥
मी हीन दीन ह्मणुनि तुला जगदंबे, अंबे, दिनजननी,
समज मनीं, आणीन दारास ॥ आतां० १ ॥
शुभमंगळसौभाग्यधने, सुखसदने, शुभवदने, हे दुर्जय
रिपुभर्गे, जयदुर्गे, तूं पूर्णामृतकर चकोरास ॥ आतां० २ ॥
प्रिय आत्मज परि त्याग तुला, कां गमला, सांग मला,
संशयपट खोल, खरें मासि बोल, कां रुससी,
दुर बससी, मिटुन अधरास ॥ आतां० ३ ॥
तूं आई अशी, असुन मसी, कसुन कसी ,
बघासि कसां, उचित हें काय, तुजप्रति माय,
वसन पिवळें, हृदय कोंवळें, सदय घनरास ॥ आतां० ४ ॥
तुजविण त्रिभुवनीं मला, नच आसरा, पहा दुसरा,
ह्मणे विष्णुदासचि सार, वारंवार, असूंदे याद, अशी
फिर्याद, अर्जि सदरास ॥ आतां० ५ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ८ पद ( मुंबईत मजा गमतीची. चाल )

आदि माय रेणुके माझें । तुज काय वाटलें ओझें ॥ धृ० ॥
आनंदी सदानंद मंदिरे । अखंड सौभाग्य श्रीइंदिरे ।
त्रितापांतके त्रिपुरसुंदरे । तुझें सगुणरूप वीराजे ॥ तुज० १ ॥

तुझ्यागृहीं षड्गुणपदसंपत्ती । सदाशिव ब्रह्मदेव श्रीपती ।
अणिमादि ऋद्धि सिद्धि नांदती । वंदिती देव ऋषि राजे ॥तुज०२॥
कल्पतरु कामधेनु चहुकडे । चमकती चिंतामणिचे खडे ।
दीन जननि तुला सांकडें । कां पडलें दिनाचे काजें ॥तुज०३॥
पतितजन येतां तुझिया गडा । करिसि भवबंदाचा उलगडा ।
अर्पिसी सुखामृताचा घडा । चौघडा असा जगिं वाजे ॥तुज०४॥
ऐकुनि दुष्ट शत्रुचा फंद । तोडुं नको स्वमुलाचा संबंध ।
मोडुं नको मार्ग करूनी बंद । मोक्षाचे चारि दरवाजे ॥ तुज०५॥
मुळपिठ वासिनि तूं श्रीविद्या । त्रिभुवन पावन जिवशिववंद्या ।
गुरु दत्तात्रय तद्रुपीं संध्या । करित तिन्ही सांजे ॥ तुज० ६ ॥
ग्रासितो काळ मला दिनरात्र । परि नये दया तुला तिळमात्र ।
कां होसि निमित्तासि या पात्र । तूं शरणागतभवभंजे ॥ तुज०७ ॥
प्रेमरस-पानाची आवडी । कृपेनें भिक्षा दे येवढी ।
विष्णुस्वामीसि पावली पुडी । दधि क्षिर घृत साखर सांजे॥तुज०८॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

९ **पद—धावा** ( चाल—असा धरि छंद )

अंबाबाई । ये धांवत माझे आई ॥ धृ ॥
नमोश्रीतुळजापुरवासिनी । नमो चित्कले अविनाशिनी ।
नमो उदयोस्तु नारायणी । अखिल वर देई ॥ ये० १ ॥
पंडिते तारकाख्य वल्लभे । त्रितापांतके महादुर्लभे ।
अजरामरसुखसौरभे । देसि नरदेहीं ॥ ये० २ ॥

तुझिया करुणामृतवृष्टिनें । विकासिले सौख्यांकुरसृष्टिनें ।
तरि मजकडे कूर्मदृष्टिनें । विलोकुनि पाही ॥ ये० ३ ॥
संजीवन कला गुणमंडित । समाधित डोलसी, अखंडित ।
जोडुनि कर सुर नर पंडीत । लागती पायीं ॥ ये० ४ ॥
शरण मी तुला जगन्नायके । प्रार्थना ही माझी आयके ।
ह्मणे विष्णुदास जगदंबिके । पाव लवलाही ॥ ये० ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## १० पद

उठ जगदंबे ! आई लवलाही ॥ धृ० ॥
कशी निजलिस एकटी या घटकीं ।
देऊन झटकी मुलाही ॥ उठ० १ ॥
निर्वाण पहाण्याची, लपण्याची नूतन ।
लागली संवय तुलाही ॥ उठ० २ ॥
निजनीद बुडविसी, उगी रडविसी ।
यामधें काय भलाई ॥ उठ० ३ ॥
विष्णुदास ह्मणे, रेणुके, तुजविण ।
होतसे जीव काहि लाही ॥ उठ० ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ११ पद

उदय मुळपिठवासिनि जगदंबे ॥ धृ० ॥
कुंडलिनी कोमल तनु बालिके। हृदयकमलनिलयांबे ॥ १ ॥
लावण्यलतिके, चैतन्यकलिके। सच्चित् चिद्घन बिंबे ॥ २ ॥
श्रीवरदायनी, नमो नारायणी। जयजय कल्पकदंबे ॥ ३ ॥
महिषासुरमर्दिनि, जयवर्धिनी। सुरगण शत्रु विटंबे ॥ ४ ॥
आदि आनंदे, परमानंदे। दर्शन दे अविलंबे ॥ ५ ॥
विष्णुदास ह्मणे, शरण आलों तुज। क्षणभर मज न विसंबे ॥६॥

ॐ! ॐ!! ॐ!!!

## १२ * पद

कधीं भेटशिल आई जगदंबे! खाचित सांग तूं मला मला।
जोंवर आहेत प्राण कुडीमधें, तोंवर पाहुंदे तुला तुला ॥ धृ० ॥
मोठिच पोटीं अशा तुझें रूप, डोळे भरून पहावया वया।
जन्मचि सारा गेला अशामधें, आली दशा जुनी वयावया।
परंतु नाहीं आली दिनाची, तुझ्या मनामधें दया दया।
निबर तुझें तरि काळिज केव्हढें, धन्य धन्य अग बया बया।
गोड वाटतो तुला तुझा परि, स्वभाव नाहीं हा भला भला ॥जो० १॥

---

* हें पद पहिल्या खंडांत छापलें आहे पण त्यांत ३-४ ही कडवीं नसल्या-मुळें समग्र पद येथें घेतलें आहे.

राज्य कठिण हें आलें कलीचें, वर्तमान भलें नव्हे नव्हे ।
प्रजावृत्ति–धन हरण कराया, निघति कायदे नवे नवे ।
घरोघरीं अंधार परंतु, रस्तोरस्तीं दिवे दिवे ।
दया–धर्म–हिन माय लेंकरा, उठे माराया जिवें जिवें ।
काय उरफाटें कर्म ह्मणावें, कसे काटे आले फुला फुला ॥जो०२॥
तूं आदिमाये, ही या कलिच्या, आधीन झालिस यदा यदा ।
तव आज्ञेचि ठेवुनि वागती, विधि हरिहर मर्यादा यदा ।
कामधेनुची लेक घरोघरीं, ताक मागे ओखदा खदा ।
व्यास वाल्मिकादीक मुनीजन, पाहून हंसतील खदाखदा ।
दिन जननीचें निरक्षुनी ब्रिद, लक्षी आपुल्या मुला मुला ॥जो०३॥
नाहीं भरंवसा घालिल फासा, काळ गळ्यामधें केव्हां केव्हां ।
काय कौतुक मग पहाशिल आमुचें, जगज्जननी तूं तेव्हां तेव्हां ।
कळेल तसें पुढें करी परंतु, दे दर्शन मज येव्हां येव्हां ।
थोर तुझा उपकार आठविन, जन्मा येईल जेव्हां जेव्हां ।
यास्तव एवढी ऐक विनंति, पूर्ण करी हेतुला तुला ॥ जो० ४॥
काम क्रोध दिर दुर्धर मेले, प्रपंच–वनिं हांकिती किती ।
खचित प्राण घ्यावयासि पहाती, ताप सांगु हा किती किती ।
अहंकार सासरा हि सासु, विकल्पना कोपती पती ।
परंतु कांहीं बोलत नाहीं, निसंग माझा पती पती ।
तुजकडे पहाते उगेचि रहाते, बाळगुनी अब्रुला ब्रुला ॥ जो० ५॥
सत्वर आतां ने मज माहेरीं, ठेऊं नको सासरीं सरी ।
दे साडी जुनिबिनी एखादी, नको सोन्याची सरी सरी ।

जळो दुसऱ्याचे हार पितांबर, आइची येइना सरी सरी ।
जवळ बसूनी गोड बोल मसी, नको दमडी नासरी सरी ।
विष्णुदास ह्मणे आई, रेणुके ! तुझ्या नमितों पाउला उला ॥जो०

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

१३ *पद ( वसंतीं बघुनि मेनकेला-चाल )

कृपा कर श्रीअंबाबाई । माहुरगड वासिनी दयाळे ! दर्शन
मज देई ॥ धृ० ॥
दयाळे अंत नको पाहूं । ये लवकर करि करुणा मजवर,
निष्ठुर नको होऊं ॥
धीर कुठवरी धरुनि राहूं ।
काळ मला लागला गिळाया, चंद्र जसा राहू ॥
सोसेना विविध यातनाही ।
अझूनि माझी दया बया तुज, कशी येत नाहीं ॥ कृपा० १॥
सोडुनी ब्रह्म स्वरूपासी ।
मी जिव झालों पहावयास्तव, तुझिया रूपासी ॥
सोडुनी गृह धन धान्यासी ।
आली साठी तुजसाठीं मी, झालों सन्यासी ॥
वासना जडलि तुझ्यापायीं ।
ह्मणुनि एवढ्या खट कर्मांच्या, पडलों अपायीं ॥ कृपा० २ ॥

* हे पद पूर्वी छापलें आहे पण यांतील ५–६ हीं दोन कडवीं त्यांत नसल्यामुळें संबंध पद येथें घेतलें आहे.

नको मज दाउं माय दुसरी ।
दिन जननी तूं दीन ह्मणुन मी, बसलों तुझ्या वसरीं ॥
आवघे दोष रोष विसरी ।
अवगुण पोटीं घालुन ओटिंत, घेईं पदर पसरी ॥
तुझी किति वर्णूं चतुराई ।
करिसि राइचा पर्वत मेरू, पर्वताचि राई ॥ कृपा० ३ ॥
तूंचि मुळ पिठिची वेल्हाळा ।
अखंड तुझिया आनंद भुवनीं, उदंड सुख सोहळा ॥
दाखवी सुंदर रुप डोळा ।
सकळ भूषणालंकृत नादर, पितांबर पिंवळा ।
तूंचि जगताची रामाई ।
तूं पार्वति शिव राम सिताबाइ, विठ्ठल रखुमाई ॥ कृपा० ४ ॥
तूंचि गुरु बाप माय आजी ।
यज्ञ दान व्रत जप तप तर्पण, संध्या तूंच माझी ॥
अवडिनें सुपारि घे माझी ।
जशि विदुराची कण्या भक्षिलां, द्रौपदिचा भाजी ।
अक्षरें तीन 'रेणुका' हीं ।
वदनीं स्मरतां मंत्र तंत्र जप, नये आणिक कांहीं ॥ कृपा० ५ ॥
भयंकर मोहज्वर हटवी ।
पार्थापरि मी भ्रमलों पडलों, धरुनि हात उठवी ।
महा भवरणसागर आटवी ।
खुंटवि विधिचें कलम आपुलें, जननीपण आठवी ॥

चिंतितो तुला शेषशाई ।
मज विषयीं नको लावूं श्रुतिच्या, अक्षरांस शाई ॥ कृपा० ६॥
भ्रमरवत भव काननिं भ्रमलों ।
श्रमलों दमलों ह्मणुनि भवाश्रमिं, विश्रांतिस आलों ।
लागला तुझा हृदयिं लोलो ।
विष्णुदास ह्मणे सद्गुरुकृपेनें, पुरुषोत्तम झालों ॥
अतां पद नमुनि प्रार्थनाही ।
दे दर्शन मज याविण दुसरा, सत्य स्वार्थ नाहीं ॥ कृपा० ७॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १४ पद [ चाल—अशाश्वत संग्रह ]

काय ह्मणावें तुला । रेणुके ! कळलें उपेक्षिसी मला ॥ धृ० ॥
इच्छुनि आशा, कनक धनाची । निष्ठुर झालिस, कठोर मनाची ।
तरि मग कैसी, दीन जनाची । माय ह्मणावें तुला ॥ रेणुके !० १॥
दुर्बळ ह्मणुनी, लाविसि लोटुन । तरि मग निर्जळ, पायस घोटुन ।
सघृत साखर, बेसन कोठुन । खाई ह्मणावें तुला ॥ रेणुके !० २॥
आदरसी ज्या, लाल दुशाला । नमिळे धड पट, पदर उशाला ।
तरि मग आह्मी, दाव कशाला । पाय ह्मणावें तुला ॥ रेणुके !० ॥
तूं दिनजननी असि तरि कांगे । दीन जनाला, भरसी रागें ।
विष्णुदास ह्मणे, तरि कां मागें । जाय ह्मणावें तुला ॥ रेणुके !० ४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १५ पद [ चाल-झाली ज्याची उपवर ]

खचिताचि मग तूं, माय कशाची ।
नाहिं तुला जरि, माझि आशाची ॥ धृ० ॥
वाढविलें दहीं, दुध पाजुनि ज्या । त्या मुखीं ओपिसी, धार विषाची ॥ १ ॥
बळें काळापुढें, ढकुलुनि देसी । ओढुनि घेसी, मांडि उशाची ॥ २ ॥
भेट न देसी, जवळ न घेसी । वाटच दाविसी, दुरदेशाची ॥ ३ ॥
कां षड्रिपुची, खोड न मोडिसी । गांठ न सोडिसी, भवपाशाची ॥ ४ ॥
त्रिभुवन नायके ! काय तुला जड । वारली माझा, भीक पशाची ॥ ५ ॥
विष्णुदास ह्मणे, पतित मुखानें । ह्मणवुन घेऊं, नको कर्कशाची ॥ ६ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## १६ पद

जगदंबे हो । धांवे पावे यावे अविलंबे ॥ १ ॥
सदानंदे हो । जय नारायणी वेद वंदे हो ॥ २ ॥
माते हो आदि । आतां कृपाकरी कृपावंते ॥ ३ ॥
माये हो मूळ । सदा माझ्या ध्यानीं मनीं राहे ॥ ४ ॥
अंबाबाई हो । विष्णुदास ह्मणे माझे आई ॥ ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## १७ पद

जय भवानि भवानि बोल । तुझें वचनामृत सुविलोल ॥ धृ० ॥
भार्गवरामाच्या परि आह्मा । समसमान वजनीं तोल ॥ १ ॥

जनानि दिनाची, श्रुति वचनाची । नको करूं प्रतिज्ञा फोल ॥ २ ॥
धीर धरवेना, मज तरवेना । भवसागर खोलचि खोल ॥ ३ ॥
काढ मी फसलों, तुडवित बसलों । महापाप चिखोल चिखोल ॥४॥
घडिमधें तोडिसि, मोडिसी जोडिसी । शतकोटि विरंची गोल ॥ ५ ॥
ये, माझे आई, तूं रेणुके आई । तुझ्या चढल कीर्तिला मोल ॥ ६ ॥
विष्णुदास ह्मणे, तरि काय गाणें । तूं जरी न देसिल डोल ॥ ७ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## १८ पद

जगदंबे श्रीगजवदन-मदन-जननी । सन्मति दे भजनीं ॥ धृ० ॥
श्रीअमरेश्वरी भ्रमरे, जय प्रवरे, जयजय एकविरे ॥
वरदकरे, अमरवरे, प्रबलशरे, समरधिरे ॥ रे–णू–के, प्रखरे,
मुखरे, शिखरे, सुगरे । ह्मणे विष्णुदास हरे जय नमोस्तु विश्वंभरे ।
आ-दी-मा-ये सतत मम वसे, हृदय भुवनीं ॥ जगदंबे० ॥१॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## १९ पद

जयजय श्रीशुभ मंगळवरदे । अंबे ! जगदंबे ॥ धृ० ॥
जयजय श्रीमूळपीठ नायके, अंबे जगदंबे ॥१॥
जयजय भार्गव जननि रेणुके । अंबे जगदंबे ॥२॥
जयजय भुवनेश्वरी आदिमाये । अंबे जगदंबे ॥३॥
जयजय माहेश्वरि नारायणी । अंबे जगदंबे ॥४॥

जयजय सच्चिद्रुप कल्याणी । अंबे जगदंबे ॥५॥
जयजय दुर्गे भव–भय–भंगे । अंबे जगदंबे ॥६॥
जयजय रेणूराज–बालिके । अंबे जगदंबे ॥७॥
जयजय विष्णूदास पालिके । अंबे जगदंबे ॥८॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

**२० पद** (चाल—श्रीविधि हरिहर मूर्ति)

धांव दयाळे, अतां रेणुके, संकट पडलें मला ।
तूं दीनाची माय ह्मणुन मी, हांका मारिते तुला ॥ ध्रु० ॥
या दैवगतीच्या पायीं, बाई परदेशीं मी पडलें दुर ।
आड पडले भवसागर डोंगर, पुर लष्कर इंदुर ॥
कामक्रोध षड्रिपु हे व्याळ जसे, कवटाळिति दर्दुर ।
मज गांजाया या मेल्यांची, काय होती मगदुर ॥
गाय कसाबा हातीं देउनी, कासि रहातिस दुरदुर ।
निष्ठुर होउनी कां घालिसि धड डोळ्यामधें शेंदुर ॥
चाल—संसारीं सुख मज नाहीं, किति राहुं दुःख साहून ।
किति धीर जिवाला देऊं, किति दिवस वाट पाहून ॥
रात्रंदिन मी तळमळते, किति धाडुं पत्र लीहून ।
ह्मणे विष्णुदास तरी गाणें, किति दाऊं नित्य गाऊन ॥
चाल—नको उपेक्षा करूं भेटुनी, पुरवि माझे हेतुला ॥१॥ तूं दीनाची.॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## २१ पद

नाहीं वक्त रेणुके भला । माझी करुणा येउं दे तुला ॥
तूं असं ह्मणूं नको मला । अतां हागून लावा याला ॥धृ०॥
धड येत नाहिं बोलतां । एक अक्षर नये लीहितां ।
ह्मणे दात खाउनी पिता । अतां० ॥ १ ॥
भाउ ह्मणति रिकामा शिण । याचें काय घेतलें ऋण ।
ह्मणे पाठिचीच बहिण । अतां० ॥ २ ॥
अर्थांचि मामि मावशी । कांहिं नाहिं ह्मणति यापाशीं ।
आइ ह्मणे करूं गत कशी । अतां० ॥ ३ ॥
पुढें हात करुन बायको । ह्मणे समसम याची नको ।
हा दगड कपाळचा चुको ॥ अतां० ॥४॥
नाहीं अंगांत गुण सरसा । नाहीं हातांत एक पयसा ।
कुणी ह्मणेना जवळ या बसा ॥ अतां० ॥५॥
माझा फिरला आहे दिवस । कुणीं घेइना देव नवस ।
अवघेचि करिति वसवस ॥ अतां० ॥६॥
दीन जनाचि तुज आवडी । अशि कीर्ति आहे केवढी ।
तूं ह्मणुं नको गोष्ट येवढी ॥ अतां० ॥७॥
ह्मणे विष्णुदास तुजकडे । आलें तुजवर हें सांकडें ।
तूं ह्मणुं नको हो पलिकडे ॥ अतां० ॥८॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

**२२ पद** ( चाल--ललिताची )

निजलिस कां रेणुके ! ॥ धृ. ॥

माझ्या आयुष्याची लुट । काळें केली सांगूं कुठं ।
नको जाऊं झोंपी उठ । मुळपीठ नायके ॥ निज० १ ॥
मनाजी हा आत्मद्रोही । घर भेदील कां डोही ।
याचें कर्म तुज बाई । कां नाहीं ? ठाउकें ॥ निज० २॥
कामक्रोधादिक सहा । शत्रु चंड मुंड महा ।
सिंहारूढ होऊनि पहा । जय महाकालिके ! ॥ निज० ३ ॥
अनाथांचा प्रतिपक्ष । धरूनिया मज रक्ष।
निज ब्रीदाकडे लक्ष । दे मोक्ष-दायके ॥ निज० ४ ॥
अपराधी मी वरिष्ठ। कृपा करणें तुज इष्ट ।
विष्णुदास एकनिष्ठ । ह्मणे गोष्ट आयके ॥ निज० ५ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

**२३ पद** ( चाल--तुह्मां तो शंकर )

भवानी जयजय जय रेणुके ॥ धृ. ॥

सगुणकर्ण कुब्जराज कुमारिके, बालिके, अंबिके,
त्र्यंबके, परब्रह्म ब्रह्मांडजननी ॥ जयजय० ॥ १ ॥
भांबे, पावे, अविलंबे, जगदंबे, अंबे, दुर्गे, एकविरे,
सुंदरनयने, प्रसन्नवदने, अजरामर वरदे आनंदे ॥
प्रणवरूप-प्रकाशके । प्रणतक्लेश--विनाशके ।
विष्णुदासा सदाचरणीं, शरणोद्धारि कृपा करी ॥ जयजय०॥२॥

ॐ ! ॐ ! ! ॐ

## २४ पद

येग सावळे अंबाबाई, ग माझे आई रेणुके ॥ घृ. ॥
संसार तापानें, तापतसे ही तनु, जशी लाही लाही ग ॥
माझे आई० १॥
कर्माची कांचणी, वैऱ्याची जाचणी । सोसत नाहीं नाहींग ॥
माझे. २॥
ही वेळ स्वस्थाचि, नसे बसण्याची । येण्याची कर घाई घाईग ॥
माझे० ३॥
जवळ नसे मृगराज, तुझ्या जरी । धांव तरी पायिं पायींग ॥
माझे० ४॥
धाकट्या बहिणीचि, करी पाठराखणी । वडील तूं ताई ताईग ॥
माझे० ५॥
होतसे व्याकुळ, प्राण तुझ्याविण । भेट मला देई देईग ॥ माझे० ६॥
याविण आणिक, धन मोती माणीक । नको मज कांहीं कांहींग ॥
माझे० ॥७॥
विष्णुदास ह्मणे, रक्षुनिया दीन । सुकृत यश घेई घेई ग ॥ माझे० ८॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## २५ पद ( भैरवी )

माझी लाज तुला जगदंबे । आतां धांवत ये अविलंबे ॥ घृ. ॥
त्रिभुवन नायके, तूं माझी आयके । विनंती कल्पकदंबे ॥ आतां०॥१॥
बाळ तुझा प्रतिपाळ करी तूं । रेणुके, विश्वकुटुंबे ॥ आतां० ॥२॥

भवसंसारीं भय चिंतेचें । लागलें जाळ वळंबे ॥ आतां० ३॥
विष्णुदासा--सम जड तरले । वदुं किती ऐसे अचंबे ॥ आतां० ४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## २६ पद ( चाल—अशाश्वत संग्रह )

मी लेंकरुं तूं माय । रेणुके!, मी लेंकरुं तूं माय ॥ ध्रु. ॥
तूं विश्वाची स्वामिणी मोठी । परि मी जन्मलों तुझ्याच्र पोटीं ।
यामधें संशय काय ॥ रेणुके० १॥
तुजविण कोणापुढें मुख पसरूं । नको सहसा मज क्षणभर विसरूं ।
मी वासरुं तूं गाय ॥ रेणुके० २॥
हृदयभुवनिं मन—भ्रमर आनंदल । अव ठेकीतां रक्त कमलदल ।
सम कोमल तुझे पाय ॥ रेणुके० ३॥
विष्णुदास ह्मणे स्वहित कराया । तूं दीनांचें दुःख हराया ।
जाणसि सर्व उपाय ॥ रेणुके० ४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## २७ पद

कशी करशिल भवपार । मी भवानी ! जड अपार ॥ धृ. ॥
द्विजकुळिं जन्मुनी, झालें मी कामिनी—। चर्म कुटित चांभार ॥१॥
बनलों सारस, कीं रसना रस—। कर्दमांत कुंभार ॥ २ ॥
जगीं मजसम मी, भ्रष्ट कुटिल खळ । अखिल पाप संभार ॥ ३ ॥
व्यर्थचि अवनीं, जन्मलें जननी—। जठरिं दगड भूभार ॥ ४ ॥

न तारवे तरी, कल्पलते करी । या तन–शिळेचा पार ॥ ५ ॥
विष्णुदास ह्मणे, दिन जननी दिन–। वत्सल ध्वज ऊभार ॥ ६ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

**२८ पद** ( चाल–टाकुनि गेला सखा )

शुभवदने, तुज काय ह्मणावें ।
पुढिल शुभाशुभ, ध्यानिं अणावें ॥ धृ. ॥
संसार कांहिं, सुखकर नाहीं ।
उगी या पाई, काय शिणावें ॥ शुभ० १ ॥
किती हित झालें, किती वय गेलें ।
किती पुढें उरलें, हें जाणावें ॥ शुभ० २ ॥
कैचें सुखाचें, झाड विखाचें ।
मुळ दुःखाचें, समुळ खणावें ॥ शुभ० ३ ॥
संभ्रम सोडी, निजहित जोडी ।
जुंपुनि गाडी, बैल हाणावें ॥ शुभ० ४ ॥
विष्णूदासाचें, मत साचें ।
जगज्जननिचे गुण वर्णावें ॥ शुभ० ५ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

**२९ पद**

रेल गाडींत वसून चाल । धटि नेसून तांबडी लाल ॥ धृ. ॥

---

१ श्री विष्णुदास महाराज यांना खानदेशांतील नारायण बोवा दुसखेडकर यांनीं आपले घरीं नेले होते तव्हां स्वामिजींनीं आपल्या उपास्य देवता रेणुकेची तसबीर बरोबर नेली होती त्यावेळचें हें पद आहे.

तुज तन मन धन, केलें समर्पण । नको रागानं फुगवूं गाल ॥ १ ॥
तुझी तनु कवळा, अंगावर पिंवळी । शोभे नारळी पदरी शाल ॥२॥
तुझें रुप लावण्य,तुझे गुण अगण्य । तुझें तारुण्य वय चिरकाल ॥३॥
सरि गोफ पुतळ्या,नथ फुल वाळ्या । तुझ्या मोत्याच्या लडिमधें लाल ॥४॥
मुखचंद्र निर्मळ, कुंकुम काजळ । तुझ्या वेणीचे मोकळे बाल ॥५॥
तुज करितां नवी,कंचुकि हिरवी । जरिकाठाची बेतली काल ॥६॥
कंकण पैंजण, वाजती खणखण । तुझी मंद गजाकृति चाल ॥७॥
सुगंध भरपुर, चंदन कर्पुर । उडे केशरी रंग गुलाल ॥८॥
अति सकुमारी तूं, राजकुमारी । पायवाटेनं होतिल हाल ॥९॥
नवरंगाचा, नव भिंगाचा । तुझा अभंग रंगमहाल ॥१०॥
विषवत् नावडे, राज्य तुझ्यापुढें । गृहलक्ष्मी कवडी माल ॥११॥
विष्णुदास ह्मणे, अह्मी मनरमणे । तुला पाहून सदा खुशाल ॥१२॥

ॐ! ॐ!! ॐ!!!

पद ३० ( चाल—वस्त्रानें देह सारा० )

रेणूके काय बाई । तरि तुजला वाटतें ।
आइ तुझिया वियोगानें, उर माझें फाटतें ॥
चिंतेनें रक्त सारें, शरिराचें आटतें ।
दुःखाचे दिवस मोठ्या, धैर्यानें लोटते ॥ रेणुके. १ ॥
वर्षें हीं दोन झालीं, वर महिने अकरा ।
तरि अझुनी भेट नाहीं, आईची लेंकरा ॥
जगीं जगणें व्यर्थ वाटे, हरहर हे शंकरा ।
धिक् धिक् या जिवित्वासी, मन अगदीं वीटतें ॥ रे. २॥

करितातीं जाच भारी, मज सासू सासरा ।
निजपतिचा पहा—नाहीं, तिळभरही आसरा ॥
तरि मरणें विहित आतां, नसे मार्ग दूसरा ।
पहा प्राणोत्क्रमण कंठीं, येउनियां दाटतें ॥ रेणुके. ३ ॥
मद्वेषभावनेचा, पिळ नाहीं उकलिला ।
आइ, अझुनी कर्कशेची, दाविसि कां ठकालिला ॥
कडेलोट करुनि माझा, देह नाहीं ढकलिला ।
सत्कीर्ति तुझी ऐसी, गातिल कीं भाट ते ॥ रेणुके० ४॥
जगदंबे ! जगन्नाथे ! निर्दयता बस् करीं ।
निर्वाणीं निकराचीं, पुरे झाली मस्करी ॥
तनुतुनिया प्राण माझा, जाइल कीं भस्करी ।
सहजचिया किरकिरीचें, मग मुळचीं खुंटतें ॥ रेणुके० ५ ॥
किति पाहसी दोष वाया, पाऊला पाउलीं ।
स्वयें जगतीं नाचवीसी, भाऊला भाउली ॥
तरि नससी काय विष्णूदासाची माउली ।
समजुन घे आपुलेचि, जणुं दंत ओष्ट ते ॥ रेणुके० ६ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ३१ पद

समज बाई । आई मुलावीण लटकी ॥ धृ० ॥
तूं दीन जननी, दीन जनास्तव । वससी या मूळ पिठकीं ॥१॥
भूप प्रजानन, मंडित शोभे । शोभत रणशूर कटकीं ॥२॥
पाहूं नको निरत्राण तुझ्या या । पडली मुलावर पटकी ॥३॥

बिन आइ होशिल, कुणीकडे पहाशिल। बसशील कीं येकट कीं॥४॥
अविनय कोटी, परि निज पोटीं। घे, गिळुनी गटगट कीं॥५॥
विष्णुदास ह्मणे, जय जगदंबे। दे, ममतामृत घुटकी॥६॥
ॐ! ॐ!! ॐ!!!

---

# अभंग देवींचे.

—* ॐ *—

## ३२ अभंग.

अज्ञान अंधार पडलासे दाट। आतां मज वाट दाखवावी॥१॥
कडाडतीं झाडें मोडताती काटे। आदळती गोटे वेळोवेळां॥२॥
कल्पनेच्या संगें वाढल्या आगळ्या। वासनेच्या जाळ्या चहूंकडे॥३॥
कामक्रोध व्याघ्र लांडगे अजगर। दुःखाचे डोंगर मोठमोठे॥४॥
आतां लवकरी येई माझे आई। उचलोनि घेई कडेवरी॥५॥
विष्णुदास ह्मणे येउं देई कींव। घाबरला जीव तुजसाठीं॥६॥
ॐ! ॐ!! ॐ!!!

## ३३ अभंग

अग आई तूं रेणुके। माझी विनंती आयके॥१॥
तुझें अज्ञान लेंकरूं। साधनें मी कांय करूं॥२॥
तुझ्या नांवाच्या प्रतापें। जळति महा घोर पापें॥३॥
करितां नाम पारायण। नर होय नारायण॥४॥

भेदाभेद तुजपाशीं । तैसा नाहीं की नामासी ।।५।।
जाणों नाम तुझें माय । नेणों आणीक उपाय ।।६।।
विष्णुदास अनुवादे । तुज ठाऊक असूंदे ।।७।।
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ३४ अभंग

आजी धन्य धन्य झालों । मूळ पीठासनीं आलों ।।१।।
तुझीं पाहिलीं पाउलें । माझें मन सुख पावलें ।।२।।
सदानंदी मोक्षदानी । निरंतर राहे ध्यानीं ।।३।।
मज घेई वो ओसंगे । रेणुके तूं माय गंगे ।।४।।
देई प्रेमपान भिक्षा । हीच पुरवी अपेक्षा ।।५।।
विष्णुस्वामीला सन्मुख । आतां धाडूं ने विन्मुख ।।६।।
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ३५ अभंग.

अग अनाथाचे आई । तुला म्हणती अंबाबाई ।। १ ।।
तरी थोडी बहुत कांहीं । मजवर कृपा केली नाहीं ।। २ ।।
ऐसें माझ्या चित्ताठाईं । माझें मन देतें ग्वाही ।। ३ ।।
विष्णुदास म्हणे पाही । अंबे ! कृपावंत होई ।। ४ ।।
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ३६ अभंग.

ऐसी अंतर पारखी । कोण रेणुके सारखी ।।१।।
सर्व साक्षिणी डोळस । कदा करीना आळस ।।२।।

जाणे दिनाची कळवळ । धांवुनिया ये जवळ ॥३॥
मागुं नेणें बाळ तान्हे । माय पुरवी भूक तहान ॥४॥
कल्पलतिका मना हीं । विकल्पाचें काम नाहीं ॥५॥
मना तिचा तूं कंटाळा । करूं नको रे चांडाळा ॥६॥
विष्णुदास ह्मणे माझी । माय प्रेमामृत पाजी ॥७॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ३७ अभंग

नित्य मातृतीर्थीं स्नान । नित्य रेणुका दर्शन ॥१॥
आदिमाये तुजपाशीं । सर्व देव तीर्थें काशी ॥२॥
उजळोनी ज्ञान ज्योती । नित्य ओवाळूं आरती ॥३॥
करूं तीर्थामृत पान । हेंचि जप तप ध्यान ॥४॥
करूं त्रिकाळ वंदन । तोडूं यमाचें बंधन ॥५॥
करूं नित्य प्रदक्षिणा । तन मन धन दक्षिणा ॥६॥
तुझ्या बैसोनी द्वारांत । गुण गाऊं दिन रात ॥७॥
नित्य पाहूं तुझें मूख । हेंचि आह्मां ब्रम्हसूख ॥८॥
नित्य विष्णुदास ह्मणे । कृपा लोभ असूं देणें ॥९॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ३८ अभंग

मातृतीर्थीं रहिवास । हेंचि वैकुंठ कैलास ॥१॥
नित्य भजन पूजन । नित्य भिक्षान्न भोजन ॥२॥
सदा प्रसन्न मूरती । वसे सिंहाद्री पर्वतीं ॥३॥

सदा रेणुका माउली । करी कृपेची साउली ॥४॥
विष्णुदास स्वामी ह्मणे । आतां आह्मां काय उणें ॥५॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ३९ अभंग

मूळपीठाची वेल्हाळा । आदिमाय ज्ञानकळा ॥१॥
आई बैसली नवरात्रीं । झडति चौघडे वाजंत्री ॥२॥
पुढें घटमंडित माळा । द्वारीं होतसे सोहळा ॥३॥
देव देवी गण मातृका । ऋद्धि सिद्धि महाकालिका ॥४॥
पूर्णाहूती होमानळीं, पडति चंड मुंड बळी ॥५॥
भुतें गोंधळ घालिती । भक्त उदयो बोलती ॥६॥
विष्णुदास म्हणे धालों । आजी धन्यधन्य झालों ॥७॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ४० अभंग

येग येग अंबाबाई । एकवीरे माझे आई ॥१॥
जोडुनिया दोन्ही हात । वाट तुझी मी पहात ॥२॥
शीर ठेवीन चरणीं । रूप पाहीन नयनीं ॥३॥
माझे मनाची आवडी । अंबे पुरवावी येवढी ॥४॥
वेध लागलासे चित्तीं । माय तुला सांगूं किती ॥५॥
विष्णुदास म्हणे निके । मूळ पाठवी रेणुके ॥६॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ४१ अभंग

अंबाबाईचें माहूर । आतां राहिलें तें दूर ॥१॥
माझें प्रारब्धाचि द्वाड । थोर पडले पर्वत आड ॥२॥
कामक्रोधाचा भरपूर । प्रणीतेला आला पूर ॥३॥
भाव कळोनिया आला । नर जन्म वायां गेला ॥४॥
दंभ मत्सर दांडगे । मधें अडविती लांडगे ॥५॥
विष्णुदास ह्मणे पाही । दुरावली अंबाबाई ॥६॥
ॐ ! ॐ !! ॐ!!!

## ४२ अभंग

दीन अनाथाचे आई । तुला म्हणती अंबाबाई ॥१॥
तरी थोडी बहुत कांहीं । मजवर कृपा केली नाहीं ॥२॥
ऐसें माझे चित्ता ठाईं । देत असे मन ग्वाही ॥३॥
विष्णुदास लागे पायीं । अंबे, कृपावंत होई ॥४॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ४३ अभंग

माझी रेणुका माउली । कल्पवृक्षांची साउली ॥१॥
जैसी वत्सालागीं गाय । तैसी अनाथासी माय ॥२॥
हाके सरशी घाइघाई । वेगें धांवतची पायीं ॥३ ॥
आली तापल्या उन्हांत । नाहीं आळस मनांत ॥४॥
खालीं बैस घे आराम । मुखावरती आला घाम ॥५॥
विष्णुदास आदरानें । वारा घाली पदरानें ॥६॥
ॐ !!! ॐ !! ॐ !!!

---

# पदें श्रीदत्ताचीं

—* ॐ *—

**४४ पद** ( चाल—तगमगती राधा )

कृपा करि आतां । गुरु दत्तात्रय अवधूता ॥ धृ. ॥
पतितोद्धारा । पतित मी आलों तुझ्या द्वारा ॥
राहे सामोरा । अतां नको होउं पाठमोरा ॥
परम उदारा । येवढी विनंति अवधारा ॥
विहित सुधाधारा । चालवी वडिलांचा धारा ॥
तोषवी अतिता । अत्रि अनसूयेच्या सूता ॥ कृपा० १ ॥
भ्रमरसा भ्रमलों । विषयवनीं अजवरती श्रमलों ॥
कनकीं अनुसरलों । तुझें पदपंकज वीसरलों ॥
सुमार्गचि चुकलों । कुसंगें स्वहितासी मुकलों ॥
निराश्रित झालों । दैवें या भवदाश्रमिं आलों ॥
ऐकिली वार्ता । प्रभु समर्थ दत्त दाता ॥ कृपा० २ ॥
अगा श्रीरंगा । चतुरानना कर्पुरांगा ॥
तापत्रयभंगा । त्रिवेणी तापत्रय भंगा ॥
भक्तमनोरंगा । येवो करुणेचा पूर तरंगा ॥
घेई ओसंगा । हृदयिं अलिंगुन सुखसंगा ॥
भूमंडाळें वहातां उद्धरी गुणदोष न पहातां ॥कृपा०३॥
तुमची आसामी । पतित मी तुह्मि पावन स्वामी ॥
परत परधामीं । जाइना येथुन सहसा मी ॥

स्तवितां स्मरगामी ॥ ऐन या कलिच्या हंगामीं ॥
नहो बदनामी । वरी जय पावन ब्रिदनामी ॥
दीनाच्या नाथा । विष्णुदासाचा उजळ माथा ॥ कृपा. ४ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

**४५ पद** ( चाल—जाई परतूनी बाळा )

दत्तात्रय मूर्ती ! श्रीगुरू ॥
त्रिगुणात्मक अवतार दिगंबर ।
तो सिंहाद्रिगिरिविरती ॥ श्रीगुरु.॥ धृ. ॥

षड्गुण पदसंपन्न विराजे । वंदिति सुरवर मुनिजन राजे ।
दशशतमुख वेदश्रुति लाजे । गातां प्रभु कीर्ती ॥ श्रीगुरु. १ ॥
डमरु कमंडलु त्रिशुळमाळा । शंखचक्र पीतांबर पिंवळा ।
जटा मुगुट व्याघ्रांबर शाळा । श्रीचंदन विभुती ॥ श्रीगुरु. २॥
हे शरणागत पातकगंगा । हे करुणामृत सिंधु तरंगा ।
विष्णुदास ह्मणे त्रिवेणी गंगा । यमुना भागिरथी ॥ श्रीगुरु. ३॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

**४६ पद** ( चाल—इस तन धनको )

दावि दावि दत्ता सुखद पदारे ।
रतलें मन पदकमलीं सदारे ॥ धृ. ॥
कमलासन कमलापति पार्वती ।
वल्लभ एकाचि अव्यक्त मूर्ती ॥१॥
विश्वंभरणा ऐकुनि करुणा ।
चुकवि दयाळा, जनन मरणा ॥२॥

ब्रह्मांडपिंडीं माया रचिता ।
कर्ता करविता श्रीगुरुनाथा ॥३॥
भवनिधि तारक पारक भक्ता ।
कैवल्यदायक निजसुख दाता ॥४॥
विष्णुदास ह्मणे स्वहित करारे ।
दत्त पदांबुज हृदयीं धरारे ॥५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ४७ पद

दावी कल्पद्रुम चरणा । दत्ता निरंजन रमणा ।
हार कंठिं अकुंठित भ्रमणा । कोटि-संकट-कटक-हरणा ॥दावी०॥धृ.॥
तूं करुणामृतरसभरणा । ब्रम्ह सनातन परिपूर्णा ।
सद्गुरु चिंतामणि सुखकिरणा । विष्णुदास म्हणे विश्वंभरणा ॥दावी० १॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ४८ पद ( चाल—इस तन धनका )

तारि तारि दत्तात्रय गुरुराया
लागलों संसार डोहीं मराया ॥ धृ. ॥
संत समागम हीन अडाणी ।
राहिलों शिकलों मि नाहीं तराया ॥१॥
जंव जंव धडपड करितों निघाया ।
तंव तंव ढसळतो आंत घसराया ॥२॥
जातों बुडी उडी घालूनि काढी ।
लागलें आकंठ पाणी शिराया ॥३॥

तूं दिनवत्सल दीन मी ह्मणुनी ।
निर्वाणीं उमजलों पाय स्मराया ॥४॥
विष्णुदास ह्मणे काय, बा ! अवघड ।
येवढें माझें दुःख हराया ॥५॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

**४९ पद** ( चाल—मज बोध करी. )

ये अनाथ-नाथ सदय-हृदय कोमला ।
निर्वाणीं चक्रपाणि सोडवीं मला ॥धृ. ॥
कामक्रोध कोडगे हे । जसे सशास लांडगे हे ।
तसेच दुष्ट दांडगे हे । तोडिती मला ॥ ये. १॥
चिंतितां तुझेचि पाय । अधिक करिती खाय खाय ।
व्याघ्रें कोंडलिया गाय । उपाय हरपला ॥ ये. २॥
फाशि पारधी ते खळ । कापुं पहाति कंठनाळ ।
कोण रक्षिता दयाळ । तुजविणें मला ॥ ये. ३॥
विष्णुदास ह्मणे धांव । पतितपावना तूं पाव ।
राखि सोडुं नको नांव । गूण आपला ॥ ये. ४ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

**५० अभंग**

अगा अत्रिच्या नंदना । अतां बैसावें भोजना ॥१॥
पीठ स्वस्तीक मांडिलें । ताटीं पक्वान्न वाढिलें ॥२॥

रंग मालिका रांगोळी । गंध धूप दीपावळी ॥३॥
प्रेमामृताचें भोजन । हस्तोदक आचमन ॥४॥
विष्णुदास सुदक्षिणा । तुळसी पत्र प्रदक्षिणा ॥५॥
ॐ। ॐ ॥ ॐ ॥।

---

# पदें श्रीशंकराचीं

— ॐ —

**५१ पद उनकेश्वराचें** ( चाल—चंद्रकांत राजाची )

धन्य सुदिन दिनमणी उगवला, आनंद बहु झाला ।
श्रीरघुविर शरभंग ऋषीच्या, भुवनाप्रति आला ॥धृ.॥
श्रीरामायण पुण्यपरायण, वाल्मिकऋषि बोले ।
ब्रह्मदेव ऋषि देवगणांसह, शिवशंकर डोले ॥
भारद्वाजाश्रमीं शांतवन, भरताचें केलें ।
सोडुनि त्रिकुटाचल पर्वत मग, राम पुढें चाले ।
सदार सानुज प्रवेशला सिंहाद्रि, प्रदेशाला ॥ श्रीरघु. १॥
श्रीप्रणितातट निकटची उनकेश्वर दक्षिणभागीं ॥
सिद्ध पुरुष शरभंग ऋषीचा, आश्रम त्या जागीं ॥
गौतम देवल भृगु कपिलादिक, वसती महायोगी ।
श्रीरामाचें येणें इच्छिती, अनुदिनीं अनुरागी ।
तो निरवाणी सकल विराधें वृत्तांत श्रुत केला ॥ श्रीरघु.२ ॥
श्रीरघुपतिच्या भेटिस आल्या, सुरऋषिच्या थाटी ।

इंद्र बृहस्पती सागर सरिता तीर्थावळी कोटी ॥
अभिवंदुनि दे श्रीरघुनंदन, आलिंगन भेटी ।
स्वानंदामृत वृष्टि वर्षुनि, आनंदली सृष्टी ॥
अखंडघन शरभंग उष्णजळ, मागे राघवाला ॥ श्रीरघु. ३॥
सोडुनि वडवानळ शरधरणी, अभंग शरभंगा ।
पाताळांतुनि अणुनि समर्पिली, उष्णोदक गंगा ॥
तज्जळस्नानें दुरितें हरती, दुर्धर दुर्भगा ।
पावती सुंदर रुप नरनारी, कुश्चळ कुरुपांगा ।
तो मुनि कृपेचा लाभ लाभला, सदैव सकळांला ॥श्रीरघु.४॥
हें उनकेश्वर परम तपोवन, पावन लोकत्रया ।
उष्ण शितळ जळकुंड अखंडित, नाना द्रुम छाया ॥
रामसिता, सौमित्र, मारुती मूर्ति त्या ठाया ।
दत्त, गणपती, शिवपार्वती, अनपूर्णा, आदिमाया ॥
विष्णुस्वामि ह्मणे सहज पावलों,निज विश्रामाला ॥श्रीरघु.५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ५१ पद ( भैरवी )

शिवहर शंकर भोलानाथ ॥ धृ० ॥
गौरि अर्धांगीं मस्तकीं शोभे । गंगा रजनी-कांत ॥१॥
पंचानन दश भूज विराजित । स्कंद-गजानम-तात ॥२॥
गज चर्मांबर भस्म विभूषित । प्रळयानळ नयनांत ॥३॥
विष्णुदास ह्मणे भवसागरिंया । बुडतों देईं हात ॥४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

# पदें श्रीरामाचीं

—* ॐ *—

## ५२ पद ( चाल—राम स्मरावा )

राम जगजीवन, जगची राम ॥ धृ० ॥
दशरथनंदन, जानकिजीवन, पूर्णब्रह्म विश्राम ।
आदिनारायण, भक्तपरायण, मुनिजन मानस धाम ॥१॥
भक्तासाठीं हिंडतसे प्रभू, काननिं सोडुनि ग्राम ।
खळ राक्षसकुळ सकळ मारिलें, करूनि उग्र संग्राम ॥२॥
नको साधन जपतपाचि खटपट, तीर्थाटण व्यायाम ।
रामनाम हें एकनिष्ठ वद, रात्रंदिन आठ याम ॥३॥
रामचि ह्मणतां रामचि देतो, भू—वैकुंठ इनाम ।
विष्णुदास ह्मणे अजरामर कर, अमृत रामचि नाम ॥४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ५३ पद

रघुविर राहत गंगा तीरीं ॥ धृ० ॥
पत्र तृणकुटीं पंचवटींच्या, आश्रमीं वास करी ॥ रघु० १॥
वल्कलमंडित विजयी अखंडित, कोदंड चाप करीं ॥ रघु० २ ॥
भक्तासाठीं तो जगजेठी, तापस रूप धरी ॥ रघु० ३ ॥
विष्णुदासा करि पुरुषोत्तम । ठेवुनि हात शिरीं ॥ रघु० ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

**५४ पद** ( चाल—राम स्मरावा )

रघुवीर, कोमल तनु घनश्याम । सदय हृदय श्रीराम ।। ध्रृ० ।।
दशरथनंदन जानकीजीवन । दिनकर कुल विश्राम ।। रघु० १।।
त्रिभुवनपावन दीनदयाघन- । मुनिजन मानस धाम ।।रघु० २।।
निर्मळ चिद्धन नाथ निरंजन- । निर्गुण जो निष्काम ।।रघु० ३।।
विष्णुदास ह्मणे जगिं सर्वोत्तम- । उत्तम राघव नाम ।।रघु० ४।।

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

**५५ पद** ( चाल—थोर तुझे उपकार )

कुशल आहे रघुवीर, शुभानने ! ।। ध्रृ० ।।
तव विरहानळें, व्याकुळ होउनि । सोडुनि गंगातीर ।।शु. १।।
रात्रंदिन दीन, होउनि फिरला, । ढाळित नयनीं नीर ।।शु.२।।
सुग्रीव मैत्रीं, जोडुनि ऋषिमुख । पर्वतिं जाहला स्थीर । शु.३।।
अवचित काळीं, वधिला वाळी । जो बळ निधि रणधीर ।।शु.४।।
तुज शोधाया, पाठविलें मज । क्षणभर न पडे धीर । शु. ५।।
विष्णुदास ह्मणे, केलें तयाच्या । चरणार्पण हें शीर ।।शु.६।।

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

**५६ पद** ( चाल—होतो द्वारका भुवनीं )

येरे जानकी-जीवना । त्राता तूंचि त्रिभुवना ।
असुरद्रोही अहिशयना । रामा ! कमल-विमल नयना ।।ध्रृ.।।
तूं रघुविर रणधिर गुणगहना । सुंदर नरवर कलिमल दहना ।

खल दशकंटक कटक मर्दना। विष्णुदास ह्मणे।
निजसुख–सदना॥ येरे जानकी-जीवना॥ १॥

ॐ। ॐ।। ॐ।।।

**अत्र्याश्रमांत अनसूया व सीता देवींचा झालेला प्रेम-संवाद**

**५७ दिंड्या**

त्यजुनि त्रिकुटाचल, राम पुढें झाला।
देखताती वीचित्र, वनलीला॥
कठिण मार्ग बहू, देव दानवाला।
नाहिं जेथें संचार, मानवाला॥१॥
सिंह व्याघ्र अस्वलें गजजाती।
पशूपक्षी भ्यासूर हिंडताती॥
भुतें यक्ष वेताळ नाचताती।
राक्षसांचे किंकाट शब्द होती॥२॥
वृक्ष नाना लागले घनदाट।
सूर्य बिंबापर्यंत ते अचाट॥
तळीं किरणें यावया नाहिं वाट।
ठायिं ठायीं वाहती जळपाट॥३॥
रामसीता सौमित्र पुढें चाले।
भ्रमत अत्री आश्रमाप्रती आले।
दत्तमूर्तीसी आधिं नमन केलें।
अनूसूया जानकीप्रती बोले॥४॥

अनसूया—

पराकाष्टें श्रमलीस, सिताबाई ।
कधीं पायीं फिरण्याचि सवे नाहीं ।
तुला झाला वनवास कशा पायीं ।
मजपाशीं तूं सांग लवलाही ॥५॥

सीता—

**पद** ( चाल—वस्त्रानें देह सारा )

गति बाई अनुसूये, काय सांगूं आपली ॥धृ०॥
ती कैकयी सासुबाई, पतिवरती कोपली ।
त्या योगें वनीं आह्मीं, त्रय वर्षं लोटलीं ॥
तूं येथें सत्य आई, अजि मजला भेटली ॥६॥

अनसूया—

**दिंडी**

कशासाठीं कैकयिस कोप आला ।
तिच्या दशरथ अंकीत कसा झाला ।
कसें त्यानें धाडिलें वनिं तुह्मांला ।
वाटतें हें आश्चर्य बहु अह्माला ॥७॥

सीता—

**पद** चाल—सदर

निजपतिचा कैकयीला, वर झाला कंदनीं ।
तिनें दिधला बाइ, होता, कर अपुला स्यंदनीं ।
तो पडला भूपतीच्या, वचनाच्या बंधनीं ।
भरताला राज्य द्याया, बहु रडली स्फुंदुनी ।
स्वामीला वनवासा, धाडाया तडफली ॥गति०८॥

अनसूया—

**दिंडी**

नसे कैकयिच्या मत्सरासि लेखा ।
जसें पार्थी दुर्वीष वाढिलें खा ।
तसें म्हणें ती घे राज्यभाग लेका ।
तरी भरतातें योग्य वाटलें कां ? ॥९॥

सीता—

**पद** चाल—सदर

ती जेव्हां पडलि होती, कैकयि या आग्रहीं ।
तो तेव्हां भरत होता, निज मातूल—गृहीं ।
मग त्यासी दुःखवार्ता, कळतांची साग्र ही ।
त्यागूनी राज्य गेला, तपोवनिं तो निग्रही ।
मग सारी कैकयीची, किरकिरची संपली ॥गति० १०॥

अनसूया—

**दिंडी**

उपेक्षीतां भरतानें राज्य भाग ।
सहज रामासी घेणें आलें भाग ॥
कार्य झालें निर्विघ्न यथासांग ।
तरी कां हा वनवास अतां सांग ॥११॥

सीता—

**पद** चाल—सदर

कैकयिनें आधिं आह्मां वनवासा लाविलें ।
त्यायोगें श्वशुर माझे परधामा पावले ।
परि आज्ञा वचन त्यांचें, शिरिं तैसें राहिलें ।

ह्मणुनीया वनीं आलों, हीं पहाया पाउलें ।
बहु जन्मोजन्मिचीं हीं, श्रम बाधा हरपली ॥गति० १२॥

अनसूया— दिंडी

तुला जन्मापासूनि कष्ट झाले ।
तुझ्या लग्नांतहि होतें विघ्न आलें ।
तुझ्या पतिनें तें सर्व दूर केलें ।
असें कानोकानींच आयकीलें ॥१३॥

सीता— पद चाल—सदर

आइ धरणी जनक माझा, धर्माचा बाप तो ।
लग्नाला विघ्न आला, लंकेचा भूप तो ।
पण पडला भार्गवाचें, उचलीतां चाप तो ।
स्वामीनीं दूर केला, अवघाचौ ताप तो ।
मग प्रभुच्या म्यांहि कंठीं, वरमाळा घातली ॥गति० १४॥

अनसूया— दिंडी

चंदनाची उटि माळ सूमनाचीं ।
घेई नोहे आरद्रता मनाची ।
समाधानी करि बाइ कर मनाची ।
विष्णुदास म्हणे कांहीं करमनाची ॥१५॥

**कविचा अभिप्रायः—** **पद** चाल—सदर

तों गंगा जान्हवी या, भेटलि गंगा हिला ।
कीं भूकेलेलीं तान्हीं, पानवल्या गाइला ।

प्रेमाची भरति प्रेमें, पावलि रंगाइला ।
म्हणे विष्णुदास प्रेमें प्रेमादर गाइला ।
कीं दुहेरी कंठि एक्या, सूत्रानें गुंफिली ॥गति० १६॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## पदें श्रीकृष्णाचीं

—* ॐ *—

### ५८ धांवा (पद) ( चाल—ललिताची )

करि करुणा केशवा । लवकर ये माधवा ॥धृ०॥
धांव कृष्णा, वनमाळी । ब्रीद आपुलें सांभाळी ।
शरणागत प्रतिपाळी । दीन वत्सला बांधवा ॥करि० १॥
ह्मणविसी कृपावंत । तरि कां पाहतोसी अंत ।
सांग झालिया देहांत । मग येसी केधवा ॥करि० २॥
गायी वळतां श्रमलासी । वनोवनीं भ्रमलासी ।
गोपीसंगें रमलासी । निजलासी यादवा ॥ करि० ३॥
उद्धवासी सोडविलें । यादव कूळ बुडविलें ।
पांडव सत्व वाढविलें । निवटुनिया कौरवा ॥करि० ४॥
तूं गुरु मायबाप बंधू । विजयी श्रीपति करुणासिंधू ।
तारी देउनि अमृतबिंदू । स्वयें मारी अथवा ॥करि० ५॥

म्हणे पुरुषोत्तम स्वामी । जरि कां वायां गेलों आम्हीं ।
तुझे भक्त तुझिया कामीं । करितिल कीं वाहवा ॥करि० ६॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

**५९ पद** ( चाल—इस तन धनकी )

कृष्णा ! तुझ्यापुढें हरले उपाय ।
आहे तुला तरि उचित हें काय ॥धृ. ॥
तुजविण क्षणभर, जगति न गोपी ।
मरतां तरी कोण, कोणा आटोपी ।
अवघाचि दुःखित, जन समुदाय ॥आहे० ॥१॥
वत्सें तृषित जळ, नच पीति सदनीं ।
बाळें कदा स्तन, नच घेति वदनीं ।
नच खाय तृण पहा, येकहि गाय ॥आहे०॥२॥
विस्मृति झाली, तुजसीं या घटकीं ।
राबलों तुजपुढें, अहीं जणुं बटकी ।
नाहीं तुला सय, तीं तीळप्राय ॥ आहे० ॥३॥
भलि केला अठवण, जन्माचि जीवा ।
मिळविली थोड्यांत, वाहवाजी वाहवा ।
धन्य तुझीं तूज, प्रसवली माय ॥ आहे० ॥४॥
तोडून टाकिलि, ममतेची दोरी ।
नाहीं तुझ्यावर, मग बळजोरी ।
मर्जी तुझी जरि, जाशील जाय ॥ आहे० ॥५॥
हर हर, शिव शिव, ह्मणे विष्णुदास ।

जाहालें तुजविण, चित्त उदास ।
कांरे ! आतां बळें, लपविसीं पाय ॥ आहे० ॥ ६ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ६० पद

बोले रागानें माय यशोदा । कांरे बैलासि दोहसी मुकुंदा ॥ धृ. ॥
नीट पुढें पहारे, कृष्णा अहारे ! गाय नव्हे मतिमंदा ॥ कांरे० १ ॥
पाहात तुझ्याकडे, उभी द्वारापुढें । राहिलि समोर राधा ॥ कांरे० २॥
भीड वडिलांचीं, सोडुनि यांनीं । मांडिला चावट धंदा ॥ कांरे० ३॥
जन अपवादें, गोविंद राधा । विरहाचि सोशीत बाधा ॥ कांरे० ४॥
विष्णुदास ह्मणे, जगजीवनावीणें । यें मन जणु ऊत दुग्ध ॥कांरे०५॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ६१ पद ( चाल—अशाश्वत संग्रह )

भलीरे केली अठवण शेवटली ॥ धृ. ॥
आधिं प्रीत जोडुन, तोडुन जाशीं । शिकलास, रित कुठली ॥१॥
या गोपींची. सुख संपत्तिचीं । दिवसा घरें लुटलीं ॥ २ ॥
शिरें गोपींचीं बहुत तुझ्यापुढें । आपटतां फुटलीं ॥३॥
विष्णुदास ह्मणे, तरि हरी तुझि कशी । बुद्धि न पालटली ॥४॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ६२ पद ( चाल—आतां मी नाहीं मी नाहीं. )

वृंदावनीं युवती, वनीं युवतीं । हरिविण बहु तळमळती ॥धृ.॥
ह्मणति अम्हीं तुजकरितां । आलों जिवाचा लोभ न धरितां ।

येउंदे कळवळ ती, कळवळ ती ॥ हरिविण० १ ॥
हिंडतो पशुवत रानीं । जहालों जर्जर बहु शरिरानीं ।
गात्रें जळजळती, जळजळती ॥ हरिविण० २ ॥
नयेचि निद्रा शयनीं । चैन पडेना दुःखें नयनीं ।
अश्रु ढळढळती, ढळढळती ॥ हरिविण० ३ ॥
चंद्र प्रकाशित गगनीं । वाटतो मेला केवळ अग्नी ।
किरणें कळकळती, कळकळती ॥ हरिविण० ४ ॥
जरि नावडती गोपी । तरि जड पर्वत मस्तकिं ओपी ।
परि नको मळमळ ती, मळमळ ती ॥ हरिविण० ५ ॥
विष्णुदास म्हणे रात्रीं । टाकुनि गेला देव अधांत्री ।
लागली हळहळ ती, हळहळ ती ॥ हरिविण० ॥ ६ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

**६३ पद** ( चाल—केवड्याच्या वनिं ग बाई )

सत्यभामा म्हणे तुम्हा तिचि प्रीत लागली हो ॥धृ०॥
राधा मंदिरीं सदा असतां । मजसि कपट धरुन बोलता ।
लटकि आण तरि वाहता । लाज नाहिं वाटली हो ॥१॥
अहो, तुम्हि ऐका यदुनायका । मंदिरिं माझ्या येऊं नका ।
वरवर लोभहि लावूं नका । म्यांहि काडि मोडली हो ॥२॥
वटिक तुम्हांहिं काय दिसली । राधा प्रियपात्र गवसली ।
बहुमर्जी तिच्यावर फिरली । नवी जोड जोडली हो ॥३॥
हरि म्हणे प्राणसखे तूं आमुची । मज तुझी प्रीत तिची कैंची ।
विष्णुकवि म्हणे यापरि हरिची । बरी खोड मोडली हो ॥४॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ६४ पद

हरि बहू मनाचा । खोटागे ॥ धृ० ॥
कसा दुःखाचा, ठेउनि गेला । जाड उरावर गोटागे ॥१॥
कशि कुब्जेचीं, लागलीं गोडी । हाचि सलतो, काटागे ॥२॥
नलगे अतां घर-दार शरिर हें । यमुना डोहीं, लोटागे ॥३॥
नाहिं तरी विष, वाटतें प्यावें । जीव करूनि धट, मोठागे ॥४॥
अमुच्या ऐशा, शतशा नारीं । नाहिंच त्याला, तोटागे ॥५॥
होता जिकडचा, तिकडेच गेला । ज्याची कळ त्या, बोटागे ॥६॥
विष्णुदास प्रभु, मौन्येंचि बसला । ओठालाउनीं, ओठागे ॥७॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ६५ पद

हरिरे ! तूं संकट माझें हरी । संसार कंसारी ॥ धृ ॥
पहा हिंसक पुतना भालि । काशि अचळ मोक्ष लाभली ।
तिचि कळवळ तुज कशी आली । नवलचि हें बलहारीं ॥१॥
खळ काळ व्याळ मर्दिला । नखाग्रीं गोवर्धन वाहिला ।
वाटलि ही तनु कशी तुला । गिरिहुन जड मोहरी ॥२॥
तांतडी दामाजीस्तव अधीं । दयाळा ! कोण धांवला तधीं ।
बादशहाच्या पुढें जधीं । कोण महार जोहरी ॥३॥
कृपेनें विष्णुदासाकडे । विलोकुनि वारी हें सांकडें ।
संसार-सागर-पुर करीं कडे । जय जय श्री नरहरी ॥४॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

# संकीर्ण पदें.

—* ॐ *—

## संतपर पदें

**६६ पद.—श्रीचिन्मयानंदाचें** (चाल—वसंति बघुन मेनकेला. )

दयाळा, तारी दिनानाथा ।
स्वामि चिन्मयानंदसरस्वति, श्रीसद्गुरुनाथा ॥ ध्रु ॥
भयंकर, भवनदिमधें पडलों ।
गरगर फिरलों गृहचक्राच्या चक्रीं सांपडलों ।
निघाया, जंवजंव धडपडलों ।
तंव तंव अधिकचि गटांगळीनें, आंतचि गडबडलों ।
दयाळा ! धांव धांव आतां ।
तुजवांचुनिया मज निर्वाणीं, कोणि नसे त्राता ॥ दयाळा. ॥१॥
नमो श्री, सद्गुरु दातारा ।
श्री औदुंबर क्षेत्रनिवासा, जय जगदोद्धारा ।
दिनांची, विनंति अवधारा ।
शरणांगत तारणें श्रेष्ठ हा, सिद्धाश्रम धारा ।
कृपेनें, काढ धरून हाता ।
पाहुं नको, निर्वाण सर्वथा घाल उडीं आतां ॥ दयाळा. २ ॥
महा भव-भयसंकट-हरणा ।
पतीत-पावन दीन-दयाघन, मजवर करि करुणा ।

भक्तजन-मानस-परिपूर्णा ।
सन्निध ऋद्धि-सिद्धि-वृद्धि-लक्ष्मी अन्नपूर्णा ।
तोषवी, क्षुधाक्रांत अतिता ।
निजपंक्तिस घेऊनि करावें, पावन या अतिता ॥ दयाळा. ३ ॥

सहजानंद दक्षिणांगा ।
सिद्ध समाधी स्वामि सच्चिदा,–नंद वामभागा ।
त्रिवेणी, त्रिगुणात्मक गंगा ।
प्रगट जाहली निर्मळ निश्चल, कलि-खळमळ-भंगा ।
चिंतितां लाभे आमरता ।
विष्णुदास ह्मणे श्रीसद्गुरुच्या, संगमि आमरता ॥ दयाळा. ४ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ६७ पद श्री शिवराम स्वामींचें

( चाल–थोर तुझे उपकार )

सद्गुरु शिवरामा ! । कृपाकर ॥ सद्गुरु. ॥धृ० ॥
पतीतपावन, दीन दयाघन–त्रिभुवन विश्रामा ॥कृपा० १॥
भक्तपरायण, यति नारायण–निर्गुण गुणधामा ॥ कृपा० २॥
त्रिभुवनीं असरा, नाहिंच दुसरा–तुजवांचुनि आह्मा ॥कृपा० ३॥
तूं भवभंजन, स्वामि निरंजन–निर्गम निष्कामा ॥ कृपा० ४॥
विष्णुदास ह्मणे, निगमहि नेणे । सद्गुरुचा महिमा ॥ कृपा० ५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## + ६८ पद श्री शंकरानंद स्वामींचें

( चाल—आरती भुवन सुंदराची )

अभिवंदन सद्गुरुपाया । शंकरानंद स्वामिराया ॥ ध्रु० ॥
पूर्वाश्रम अनुसंधान । यशवंतराव अभीधान ।
अखंडित शंकर वरदान । अपरमित कर्णासम दान ।
चाल—पुण्यशिल नरवर देसाई । विधि-लिखितावर दे शाई ।
पावला ओघ, साधिला योग, त्यागिला भोग,
चतुर्थाश्रम घे सदुपाया ॥ शंकरानंद० १ ॥
द्या वरदान नाटकाला । सुमंगल गीत पाठकाला ।
बोलवा सुरस बालकाला । डोलवा सभा नायकाला ।
चाल—शके अठराशे तेविसांत । नाटक सुमार्गशीर्षांत ।
रचिलें आह्मी, यक्षवंती ग्रामीं । विठ्ठलधामीं
ह्मणे विष्णुदास सदा गाया ॥ शंकरानंद स्वामिराया ॥ २ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

**६९ पद** ( चाल—मज बोध करी )

श्रीमहंत संत दत्तराम भारती ।
विराजमान श्रीमृगेंद्र,-नाम पर्वतीं ॥ध्रु०॥

---

+ हें पद कुबेर ( जि. नांदेड ) येथील नाटक मंडळीस कवी महाराजांनीं करून दिलें होतें. शंकरानंद उमरखेड-येहळेगांवीं होते.

१ कुबेर गांव.

ज्यासि सुप्रसन्नभूत । सुप्रसाद देत विभुत ।
अत्रिपुत्र आवधूत । दत्तमूरतीं ॥ श्रीमहंत संत० ॥ १ ॥
अखंड चित्तिं दत्तध्यान । पुराण श्रवणिं आवधान ।
नित्यधर्म अन्नदान- । सहस्र पंगतीं ॥२॥
जयजय गुरु महाराज । जयजयाजी योगीराज ।
जयजय प्रभु पूर्ण काज । भक्त सारथी ॥३॥
सिद्धस्थान निरदोष । ऋद्धि सिद्धि महापुरुष ।
करिति ब्रह्मवृंद घोष । कीर्ति वर्णिती ॥४॥
दत्तनाम सर्व काळ । झडति चौघडे त्रिकाळ ।
पणवशंख मृदंग टाळ- । घोळ गर्जतीं ॥५॥
दत्तचरणकमळिं नमन । करूनि विष्णुदास स्तवन ।
करित नित्य ध्यान-भजन-। पुजन आरती ॥६॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ७० श्लोक

चातुर्थाश्रम हा अला ह्मणुनिया, अंगीं जरा पावली ।
आहे क्षेम सदैव लक्ष प्रभुच्या, लावूनियां पावलीं ॥
आतां येथुन काव्य स्तोत्र करणें, सद्‌गूण पारायण ।
विष्णुस्वामि म्हणे नमो जय नमो, श्रीदत्त नारायण ॥१॥

ॐ !!! ॐ !! ॐ !!!

## ७१ [1] दिंडी

माघमास पौर्णिमा भृगूवारीं ।
येति देव नर नारि परीवारीं ॥
स्वर्लोकीं तोषोनिया नगारी ।
सिद्ध कीर्तिचा घाव दे नगारीं ॥१॥
चित्तिं प्रेमाचा बिंदु सांठवावा ।
अनंदाचा अजि सूर्य भेटवावा ।
समर्थांनीं निजभक्त आठवावा ।
प्रसादाचा अवशेष पाठवावा ॥२॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ७२ अभंग

श्रीगुरुसमर्थ शिवरामस्वामी । जिवाची विश्रामी शिवराम ॥१॥
कृपाघन कल्पवृक्षाची साउली । सद्गुरु माउली शिवराम ॥२॥
सर्व देव देवी तीर्थ धर्म दान । जप तप ध्यान शिवराम ॥३॥
शिवराम बाप शिवराम आई । सद्गुरु विदेही शिवराम ॥४॥
विष्णुदास ह्मणे समाधि विराजे । आजे-गुरु माझे शिवराम ॥५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

---

१ माहूर येथें श्रीदत्तशिखरचे विद्यमान महंत यांनीं आपले गुरु श्री गोविंदभारती यांचा उत्सव केला त्यावेळची ही हकीगत आहे.

## ७३ अभंग

गुरु शिवराम स्वामी । नांदे औदुंबर ग्रामीं ॥१॥
तया माझा नमस्कार । मनोभावें वारंवार ॥२॥
सदा राहो त्याचें ध्यान । हेंचि जप तप दान ॥३॥
विष्णुदास ह्मणे भावें । सदा गुरु-गुण गावे ॥४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ७४ अभंग

देव मायबाप आजा । गुरू शिवराम माझा ॥१॥
गया काशी विश्वंभर । जगन्नाथ रामेश्वर ॥२॥
कोरी माहूर भूमिका । वृंदावन श्रीद्वारका ॥३॥
सप्तशृंग तुळजापूर । श्रीशैल्य पंढरपूर ॥४॥
ह्मणे विष्णुदास स्वामी । पूर्ण यात्रा शिवरामीं ॥५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ७५ अभंग

धन्य गुरू शिवरामा- । नंदस्वामी आत्मारामा ॥१॥
तूंच कैवल्य प्रत्यक्ष । कामधेनू कल्पवृक्ष ॥२॥
धर्म अर्थ काम मोक्ष । परात्पर अपरोक्ष ॥३॥
पूर्णकाम चिंतामणी । चंद्र तारा वासरमणी ॥४॥
यतीश्वर नारायण । परब्रह्म पारायण ॥५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ७६ अभंग

नमो सद्गुरू शिवरामा । नमो विश्वाच्या विश्रामा ॥१॥
नमो गणेश शारदा । व्यास वाल्मीकि नारदा ॥२॥
नमो दत्त निरंजना । नमो साधू-संत जना ॥३॥
सदानंद विष्णुदासा । नमोनमो परमहंसा ॥४॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ७७ अभंग

नमो सद्गुरू दातारा । शिवराम अवतारा ॥१॥
नमो ज्ञानाच्या सागरा । नमो कृपेच्या आगरा ॥२॥
माझी पूरवा वासना । दृढ चावी उपासना ॥३॥
नमो संसारमोचना ! । नमो सर्वत्र लोचना ॥४॥
विष्णुदास मागे दान । सदा लावी आत्मध्यान ॥५॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ७८ अभंग

झाली संताची ही भेटी । जीव शीवा पडली गांठी ॥१॥
सुखसिंधू हेलावला । पूर्णचंद्र ऊगवला ॥२॥
केलें चकोरा अर्पण । परमामृत समर्पण ॥३॥
ग्रंथी देहाची सूटली । वाचा वैखरी खुंटली ॥४॥
नाहीं कोठें येणें जाणें । नाहीं उरलें बोलणें ॥५॥
धन्य धन्य झालों आतां । गेली भव-भय-चिंता ॥६॥
विष्णुदास पारायण । नारायण नारायण ॥७॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ७९ अभंग

नमो सद्गुरु दातारा । पूर्णानंद अवतारा ॥१॥
कृपादृष्टिनें अवलोकीं । बैसवावें पुण्यश्लोकीं ॥२॥
अगा, अनाथाच्या नाथा । करी पावन दिनानाथा ॥३॥
भवार्णवीं संरक्षावें । शरणांगता नुपेक्षावे ॥४॥
पूर्णानंदिं अनुसंधान । पूर्णानंदीं लावी ध्यान ॥५॥
विष्णुदासाची अपेक्षा । द्यावी पूर्णानंद भिक्षा ॥८॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ८० अभंग

पूर्णानंद झाला पूर्णानंद धाला । पूर्णानंद आला पूर्णानंदीं ॥१॥
पूर्णानंद नांव । पूर्णानंद गांव । पूर्णानंद ठाव पूर्णानंदीं ॥२॥
पूर्णानंद सृष्टी पूर्णानंद वृष्टी । पूर्णानंद दृष्टी पूर्णानंदीं ॥३॥
पूर्णानंद ज्ञान पूर्णानंद स्नान । पूर्णानंद ध्यान पूर्णानंदीं ॥४॥
पूर्णानंद ऋद्धि । पूर्णानंद सिद्धि । पूर्णानंद समाधी पूर्णानंदीं॥५॥
विष्णुदास ह्मणे पूर्णानंदस्वामी । पूर्णानंद नामीं पूर्णानंद ॥६॥
ॐ !! ॐ !! ॐ !!!



# उपदेशपर पदें

—* ॐ *—

## ८१ पद ( चाल—इस तन धनकी )

हरहर ! शिव शिव ! काय मीं केलें ।
दुर्लभ आयुष्य-धन गमावीलें ॥ धृ० ॥
केवळ या नीच विषयाचे साठीं ।
खर्चिल्या घटिका फुकटचि साठीं ।
नाहींच सुकृत-फळ कमावीलें ॥१॥
अवचट या नरजन्मासि आलों ।
परि आत्मघातासि पात्रचि झालों ।
व्यर्थचि निज जननिस श्रमवीलें ॥२॥
पशुवत वागलों अहार विहारीं ।
अंतरला मज, सखा नरहारीं ।
नाहीं तया क्षणभर आठवीलें ॥३॥
अशाश्वत संतत संपत लटकी ।
नयेचि समागमें कवडीहि फुटकी ॥
सर्वांनीं सर्वोपरि नागवीलें ॥४॥
यमदूत येतांचि दारवड्याला ।
बाहेर ढकालिलें मज एकट्याला ।
आपपर लोकांहीं मज बोलवीलें ॥५॥
विष्णुदास म्हणे प्रार्थितों आतां ।

कळेल तसें करी लक्ष्मीकांता ।
निर्वाणिं दुःख हें तुज कळवीलें ॥६॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ८२ पद.

काय गा ! ही मौज परमेश्वरा पाहासी ॥धृ॥
खुंटेना पूर्व जन्मिचें पाप । सदा दुर्दैन्य दुःख संताप ।
मजवर फिरून पडला बाप । आई देइना खायासी ॥१॥
शिरावर प्रपंचाचा पहाड । बायको सदा करी हाड् हाड ।
धंदा विषयाचा लबाड । लाविलें कबाड वाह्यासी ॥२॥
काम क्रोधादिक शिरजोर । मोठे दुष्ट दांडगे चोर ।
कसती कसाब जैसें ढोर । बांधुनि हात पायांसी ॥३॥
गेला तरुणपणा झरझरा । उरला अस्थींचा पिंजरा ।
झाला खोकड निलाजरा । आली जरा देहासी ॥४॥
काळ हा मला मारितो खास । घातला यानें गळ्यामधें फास ।
आतां काय उरलासे अवकाश । लागला प्राण जायासी ॥५॥
आतां या निर्वाणीं धांवणें । देवा ! अनाथासि पावणें ।
विष्णुदासासी लावणें । आपुले गुण गायासीं ॥६॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ८३ पद

आतां सावध सावध होईं । नको गाफल राहुं तूं बाई ॥धृ.॥
पहिला दुसरा, तिसराही गेला । चौथ्याचा भरंवसा नाहीं ॥१॥

सोकला वरि चोर, त्याची परिक्षा । अज्ञन पाहतीस काई ॥२॥
निशिदिनीं गांवामधें चोर फिरती । कोणाची नाहीं मनाई ॥३॥
कोणत्या वेळीं, येऊन नकळे । कापून नेतील डोई ॥४
विष्णुकवि ह्मणे, यास्तव हरिच्या । लागावें सत्वर पायीं ॥५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ८४ पद

काय विचित्र गति देवाची । सारी तळमळ व्यर्थ जिवाची ॥ धृ. ॥

भस्मासुर कंकर पामर परी ।
पुरविली पाठ शिवाची ॥१॥
कनक मृगाला पाहूनि भुलली ।
जानकी स्त्री राघवाची ॥२॥
दैवगतीनें अपूज्य झाला ।
जो वेद चौमुखे वाची ॥३॥
आजि विजयासी अपजय आला ।
मर्जी ही प्रभु केशवाची ॥४॥
विष्णुदास ह्मणे देवहि नाडती ।
परवड किती मानवाची ॥५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ८५ पद ( भैरवी )

किति करशिल संसार-गृहाशा ।
करुणाघन करुणाघना जगदीशा ॥ धृ. ॥

---

१ पाठ

नजरबंद भव, प्रपंच खोटा । हा लटपट गारूड-तमाशा ॥१॥
वृद्ध वृषभवत, मानिति स्त्रीसुत । फटफट करिती बटकी खाशा ॥२॥
गलितेंद्रिय तूं, होशिल रडशिल । खोकत बसशिल हाणित माशा[1] ॥३॥
विष्णुदास ह्मणे, जरि स्मरशील हरी । तरि या तोडिल तो भवपाशा ॥४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

८६ पद ( चाल—झाली ज्याची उपवर )

नाहीं ज्याची अनुकुल वनिता ।
त्याचा प्रपंचीं कोण फजीता ॥ धृ. ॥
निशिदिनिं काळजी काळिज जाळित ।
संतापवि मन क्षोभवि चित्ता ॥१॥
अपमान करितसे वचनोल्लंघुनी ।
स्वस्थ नसे कधीं समाधान चित्ता ॥२॥
रूपवती ती भरति पराची ।
तम कुरुपवती केवळ पलिता ॥३॥
चाळगितां गृहीं सघश घालवि ।
कुलदीप मालवि ती मोकलितां ॥४॥
विष्णुदास ह्मणे हित शिकवीतां ।
किंचित नायके हितशी कविता ॥५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

---

१ हाणसोल

८७ पद ( चाल—झाली ज्याची )

दुर्बळ पतिच्या पासुनि बाई ।

मानहानी जनीं सौख्यचि नाहीं ॥ धृ ॥

धैर्य नसे ज्या शौर्य कशाचें ।

नसे गुणांगामधें चतुराई ॥१॥

जेथें जावें तेथें हंसावें ।

अपपरक्यांनीं करुनि खिलाई ॥२॥

वंचिति जननी जनक सहोदर ।

कोण कुणाचे सखे जावाई ॥३॥

निर्फळ होती सकळ मनोरथ ।

मरण बरें त्या भर्त्यापायीं ॥४॥

विष्णुदास म्हणे श्रीमंताच्या ।

नारिचें वैभव संगीत गाई ॥५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

८८ पद ( चाल—दासी ऐसें मानुनिया )

नाहीं अनुकूल बाई, सर्वथा पती जिला ।

तो तिला न मान देइ, जो विशेष भाजिला ॥ धृ० ॥

ज्या नराचें सर्व काळ, लक्ष जारिणीवरी ।

त्याचे बायकोनें कंटका-चिये अणीवरी ।

राहावें सदैव जन्म, कंठवूनि आपुला ॥१॥

त्यांत वृद्धता विशेष, किरकीर सर्वदा ।

वक्रदृष्टी होत नाहिं, हास्यमूख एकदां ।
चैन वाटेना जिवास, थोर घोर लागला ॥२॥
त्यांत सुस्वरूप तरुण, हें शरीर नावरे ।
रात्रंदिन पंचप्राण, फिरताती भोंवरे ।
विष्णुदास बोले ताप, जात नाहिं साहिला ॥३॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

८९ पद ( चाल—इस तन धनकी )

जातों अतां अम्ही, आपुलिया गांवा ।
लोभ निरंतर, तुम्ही असों द्यावा ॥धृ०॥
अजवर आमुचा, परामर्ष केला ।
हेतु तुम्ही सर्व, सिद्धिस नेला ॥
तो कृत उपकार, काय वदावा ॥ लोभ० १ ॥
बोललों चाललों, जें अनुसंगें ।
तें बरें वाइट, एक्या प्रसंगें ।
याचा मनामधें, राग नसावा ॥ लोभ० २ ॥
दिवस सुखाचे, झरझर गेले ।
टाकुनि जाणें, जवळचि आलें ।
हा योग दैवाचा, मुख्य म्हणावा ॥ लोभ० ३ ॥
लोहदंड तुटतील, तीक्ष्ण धारी ।
परि ममतेची, न तुटे दोरी ।
ममतेनें बांधिलें, उखळासि देवा ॥ लोभ० ४ ॥

घडली ही संगत, दो दिवसांची ।
ऱ्हावी अधिक वृद्धि, प्रेमरसाची
म्हणे विष्णुकवी करुणारस गावा ॥ लोभ० ५ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ९० अभंग

अगस्तिनें सिंधु प्राशिला झरझर ।
भक्तिचा पाझर दुर्लभचि ॥१॥
भागिरथी स्वयें आणि भगीरथ ।
भक्तिचा हा पंथ दुर्लभचि ॥२॥
प्रयत्नानें रंक होईल लंकेश ।
भक्तिचा हा लेश दुर्लभचि ॥३॥
येतील भूताळें सूर्याचे तुरंग ।
भक्तिचा हा रंग दुर्लभचि ॥४॥
जिंकवेल काळ पाडुनिया होड ।
भक्तिचा हा मोड दुर्लभचि ॥५॥
मंत्र तंत्र कळों येतील सकळ ।
भक्तिचा हा खेळ दुर्लभचि ॥६॥
साधील साधक परब्रम्हपद ।
भक्तिचा आनंद दुर्लभचि ॥७॥
शेषाद्रि आणवेल मणी एकवेळ ।
भक्तिचें हें बळ दुर्लभचि ॥८॥
होईल जिवासी शिवाचा संयोग ।

भक्तिचा प्रसंग दुर्लभाचे ॥९।
मिळेल कैलासपद इह वैकुंठ ।
भक्तिची ही पेठ दुर्लभाचे ॥१०॥
पूर्णब्रह्म धूत अर्जुनाचि घोडी ।
भक्तिची ही गोडी दुर्लभचि ॥११॥
महापुरीं जाई तरोनियां देवा ।
भक्तिचा हा मेवा दुर्लभचि ॥२॥
विष्णुदास ह्मणे लावील ठिकाण ।
भक्तिची ही खूण गुरुकृपें ॥१३॥
ॐ। ॐ॥ ॐ॥।

९१ पद[1] (चाल—इस तन )

कशी जाऊं मी त्याच्या गृहा बाई गे ॥ध्रृ०॥
कीचक मेला रडवुनि गेला । कहरचि केला मजवर पाही ॥१॥
पर पुरुषासीं बोलूं कशासी । पावे विषासी त्याच्या ग बाई ॥२॥
कसें या ठिकाणीं रहावें सुखानीं । किरकर कानीं सोसत नाहीं ॥३॥
ह्मणे सैरंध्री संकटरंध्रीं । नपडे हिमाद्री ढसळुनि डोइ ॥४॥
विष्णुकवि ह्मणे बाई सुदेष्णे । बळें पाठविणें उचित हें कायी ॥५॥
ॐ! ॐ॥ ॐ॥।

---

१ श्रीविष्णुदासांनीं बरीच आख्यानें केली आहेत त्यांतच 'कीचकवध' हें आख्यान केलें होतें, पण तें उपलब्ध होत नाहीं. फक्त हें पद सांपडलें आहे. आख्यान सांपडेल तर ठीक होईल.

# आरत्या.

—* ॐ *—

## आरत्या श्रीरेणुकेच्या

### ९२ आरती पहिली

श्रीरेणुके, जय भगवंते, आनंते, अचिंते, जयवंते,
दैत्य-निहंते ॥ श्रीरेणुके जय० ॥

हे शुभवदने ! चित्सुखसदने ! श्रीवरदत्ता श्रीमंते ॥ श्री० ॥ धृ० ॥

भव अंब उदित, जगदंब मुदित । तूं सुरभि दुधित,
ये एककुदित । सदा आनंदित , सुरवरवंदित, प्रतिपाळ
क्षुधित, निज बाळ रुदित, तुज कां न विदित, हे हृदयस्थे ॥१॥

मृगराजाचल शिखर सुमंडित । कोरिभूमि मुळपीठ अखंडित,
चैतन्य कलादिप विश्वकरांडित । पाप ताप दुरदैन्य कुरांडित,
तूं रमापंडित, हे ललिते ॥२॥

श्रीदत्तात्रय योगि शास्त्रकर । सिद्ध देवदेवेश्वर शंकर ।
सन्निध श्री महाकाली भयंकर । तूं सिंहासनस्थित करुणाकर ।
ये लवकर हे भार्गवमाते ! ॥३॥

सच्चितघन महा ब्रह्मस्वरूपिणी । सकळ गूणसंपन्न शिरोमणी ।
तूं इंद्रायणी तूं दाक्षायणी । विष्णुदास ह्मणे नमो नारायणी ।
हे सत्यज्ञानमनंते ॥४॥

ॐ । ॐ ॥ ॐ ॥।

## ९३ आरती दुसरी

जयदेवी जयदेवी जयजय एकविरे ।
श्रीरेणुके जननी जय जगदोद्धारे ॥ जयजय० ॥धृ०॥
आदि नमोस्तुते सकळारंभे आनंते ।
जय उदयोस्तु नारायणि श्रीभगवंते ।
जय जगदंबे ! अंबे ! परम कृपावंते ।
जय षड्गुणैश्वर्यालंकृत श्रीमंते ॥१॥
श्रीमृगराजाचल मुळपीठासन मूर्ती ।
सतत विराजे गाजे दिग्मंडळीं कीर्ती ।
न्हाणिति नित्य सरस्वती यमुना भागिरथी ।
सुरवर मुनिजन भावें, पुजनार्चन करिती ॥ जय०२॥
मुगुट कुंडलें मंडित पीतांबर पिवळा ।
कुंकुम कज्जल केशर उटि कंकणमाळा ।
कनक-स्तंभ-मय-मंडपिं शोभे वेल्हाळा ।
त्रिकाळ होतसे मंगळ भुवनीं सुखसोहळा ॥जय०३॥
घालुनि रांगुळी उजळुनि धुपदिप सुगंधी ।
सुवर्णपात्रीं पंचामृत क्षिर बासुंदी ।
वरणभात घृत पापड दळ बेसन बुंदी ।
प्राथितों स्वस्थआनंदें जेवी आनंदी ॥ जय० ४ ॥
फळ तांबूल दक्षिणा, सुभूषण सुमनें ।
भरली ओटी मौक्तिक माणिक मणि सुमनें ।
करूनि आरती वाहिली पुष्पांजली सुमनें ।
विष्णूदास ह्मणे करि पूर्णार्चन सुमनें ॥ जय० ५ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

# संकीर्ण आरत्या.

—* ॐ *—

## ९४ आरती भार्गवरामाची.

जयदेव जयदेव जय भार्गवरामा । श्रीभार्गवरामा ।
पूर्ण ब्रह्म सनातन, त्रिभुवन विश्रामा ॥ जय० ॥ धृ. ॥
भृगुकुलमंडित महारण-पंडित विजयमणी ।
प्रसवली पुत्र चिरंजीव रुचिकात्मज रमणी ।
प्रचंड प्रबल प्रतापी द्विजस्वामी तरणी ।
खद्योतवत गत केले रिपु गण अमित रणीं ॥ जय० १॥
मुनि जमदग्नी आणि जननी कैवारें ।
वधिला खळ सहस्त्रार्जुन रणिं सहपरिवारें ।
पुढें निःक्षत्रिय केलें क्षिति-तळवट सारें ।
जडमूढ नर उद्धरिले नामामृत-सारें ॥ जय० २ ॥
दिधली भू कनकांबरें रत्नें द्विजवर्या ।
परम कृपाघन तत्पर, शरणांगत कार्या ।
नाहीं उपमा तुझिया रामा ! औदार्या ।
तोहि नसेचीं तुजसम लक्ष्मीं ज्या भार्या ॥ जय० ३ ॥
श्रीरेणुकासंनिध दक्षिण गिरिभागा ।
त्रिभुवन पावन निर्मळ पुण्यस्थळ जागा ।

वससी तेथें सन्मुनि जनमानसरंगा ।
विष्णूदास ह्मणे दे दर्शन भवभंगा ॥ जय० ४ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ९५ आरती अनुसूयेची

जयजय आदिमाये, अनुसूये ! दत्तात्रय जननीये,
ओवाळूं आरती, पंचार्ती मृगराजाचल निलये ॥जय०॥धृ.॥
श्रीशुभसौभाग्य, सुवासिणी । मंडित कंकणपाणी ।
प्रसन्न वरद सदा, द्विजवाणी । लावण्याची खाणी ।
सद्गुण सत्वाची, शिराणी । अत्रिऋषीची राणी ।
तुजपुढें पतिव्रतेची कहाणी । न वदे व्यास पुराणीं ।
न करी प्रसादाची वाणी । धांव पाव निरवाणीं ।
जयजय देवहुतीचे तनये । तुजविण जगीं चेत नये ॥जय०१॥
शुभगुण शुभांगे शुभगात्रे । पावन परमपवित्रे ।
कुंकुम मळवट तांबुल वक्त्रें । कज्जल कुरंग नेत्रे ।
बाळ्या बुगड्या मंगळसूत्रें । मुद राखडी फुलपत्रें ।
मौक्तिक रत्नमणी नक्षत्रें । हार कनकांबर छत्रें
अनंत खेळविसी स्वतंत्रे । ब्रह्मांडाचीं चित्रें ।
करुणा करि करुणाघनहृदये । श्रुत हृदयांबरिं उदये ॥जय० २॥
सिंहासन सिंहाद्रीवरती । शोभे सुंदरमूर्ती ।
श्रीहरिहर ब्रह्मादिक स्तविती । नारद तुंबर गाती ।
सन्मुनी ध्यान सदा दृढ धरितीं । जड मुढ जिव उद्धरती ।
सुरवर नर नारी जन करितीं । त्रिकाळ मंगळ आरती ।

चौघडे वाजंत्री वाजती । वेद ध्वनीं गर्जती ।
उदयाचळिं तुझिया अभ्युदये । प्रभु दिनकर उदया ये ॥जय० ३॥
पुरविसी अतीतांची अपेक्षा । किमपि न करिसी उपेक्षा ।
म्हणउनि पात्र करी अपेक्षा । श्रीशिवजीव परोक्षा ।
दुर्जय षड्रिपुसी करि शिक्षा । च्छेदुनि भव-भय-वृक्षा ।
प्रेमानंदाची दे भिक्षा । यतिची न पाहे परीक्षा ।
देशील पदकमळीं जरि साक्षा । तरि मग मागुं न मोक्षा ।
विष्णुस्वामी म्हणे, चातुर्थे । आत्मसाक्षिणी तुर्ये ॥जय० ४॥
ॐ । ॐ ।। ॐ ।।।

**०.६ आरती श्रीशंकराची** ( चाल—मज बोध करी )

जय जय शिव शीव शीव शंभुशंकरा ।
हरहर हर महादेव, चंद्रशेखरा ॥ धृ. ॥
जयजय गजवदन तात, मदन-दहना ।
जयजय प्रभु विश्वनाथ, नंदिवाहना ।
जयजय नत दिन अनाथ, जन कृपा करा ॥जयजय० १॥
शोभति शिरिं वेणि जटा मुगुट भूषणें ।
वाजति घन पैंजणादि, डमरु कंकणें ।
वर्णिति कवि अर्धनारी, नर नटेश्वरा ॥ जयजय० २ ॥
गंगाधर शूलपाणि भाललोचना ।
पंचानन गज प्रपंच-तापमोचना ।
हे कर्पुरगौर गौरीनाथ ईश्वरा ॥ जयजय० ३ ॥
अन्यायी परि मी अलों, शरण या पदा ।

तूं करुणा करुनि सकल, वारि आपदा ।
ह्मणे विष्णुदास धांव पाव किंकरा ॥ जयजय० ४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ९७ आरती श्रीनरहरीची

जयदेव जयदेव, जय प्रभु नरहरी ।
भक्तजनांचें संकट, दुर्धट परिहारी ॥ धृ० ॥
सुशील-साध्वी-कयाधु-सुत संकटिं पडला ॥
यास्तव अवताराचा, प्रसंग या पडला ।
प्रभुबळ हिरण्यकश्यपु, नेणुनि बडबडला ।
तुह्मि सक्रोधें सहस्रहि, स्तंभीं कडकडला ॥ जय० १॥
फोडुनि स्तंभ निघाला, कडकडुनी निकरें ।
तडाडिलें ब्रह्मांड, खचलीं गिरि-शिखरें ।
निजसामर्थ्यें राखुनि, विधिवर वचन खरें ।
शत्रु विदारण केला, अति तीक्ष्ण नखरें ॥ जय० २ ॥
त्रैलोक्यामधें झाला, आनंद हा सकळां ।
सुरवर वर्षिति पुष्पें, घालिती हार गळां ।
सन्मुनि द्विजगण राजे, वंदिति पदकमळा ।
पंचारति ओंवाळित, सद्भावें कमळा ॥ जय० ३ ॥
नामस्मरणें जें सुख, दिलें प्रल्हादास ।
तें विधिलाही मिळेना, पढता वेदांस ।

सोडुनि क्षिरसागर घर, केलें पुंसदास[1] ।
निज भजनीं लावावें, म्हणे विष्णुदास ॥ जय० ४ ॥

ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

### ९८ आरती श्रीरामाची

जयजय रघुनंदन प्रभु, दिन दयाघना ।
भो ! अनाथनाथ तात, पतितपावना ॥ धृ० ॥
जयजय घननीळ घनःशाम सुंदरा ।
जयजय गुण गंभिर धिर, विर धनुर्धरा ।
जयजय महाराक्षस खळ, कटक मर्दना ॥ जय० १ ॥
झाला तळिं तल्पक तो, शिरिं धरी धरा ।
झाली पदकमल युगुलिं भ्रमरि इंदिरा ।
लागलें तत्र गहन ध्यान, मदनदहना ॥ जय० २ ॥
जयजय रघुवीर कमल, विमल लोचना ।
जयजय भव फंद द्वंद, बंधमोचना ।
जयजय श्रीसच्चिद्घन, चित्तरंजना ॥ जय० ३ ॥
भो जानकीनाथ, सदय, हृदयकोमला ।
हा प्रपंचताप निपट, नको नको मला ।
आलों तुज शरण रक्षि, न करि वंचना ॥ जय० ४ ॥
तूं करुणामृतसिंधु दीनबंधु राघवा ।
तूं निर्गुण सगुणरूप, रंग आघवा ।

१ पुसद यवतमाळ जिल्ह्यांतील तालुक्याचें गांव.

जयजय क्षिति गगनानल, जल प्रभंजना ॥ जय० ५ ॥
तूं तारक भवसागरपुर, भक्त-सारथी ।
तुज अर्पण गंध धूप, दीप आरती ।
विष्णुदास भजन पुजन, नमन प्रार्थना ॥जय०६॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ९९ आरती मारुतीची १ ली

जयजय श्रीबलभीमा, मारुति अंजनिच्या नंदना हो ।
राक्षसकुळ हानना, अनाथनाथा करुणाघना हो ॥धृ०॥
सीता विरहें दुःखित, सीता सीता आक्रंदत हो ।
पंपातीर्थि तटाकिं, रघुविर पाहिला अवचित हो ।
तो प्रभु सद्गुरु केला, भावें, होऊनि शरणांगत हो ।
निश्चय पण आदरिला, सीता शुद्धीचा संकेत हो ।
दक्षिणपंथें उडाला, टाकुनि मागें प्रभंजना हो ॥जय०१॥
शोध सितेचा केला, क्रोधें जाळुनि लंकापुर हो ।
रामेश्वर लिंगापुढें, जाणों लाविला कापूर हो ।
राक्षस वधिता वहाती, तद्रक्ताचें तुंबळ पुर हो ।
नादें अंबर गर्जे, बहु भय वाटे दिग्गज मना हो ॥जय०२॥
क्षणमात्रें शतकोटी, पर्वत उपडी बाहूबळें हो ।
फाटे धरणी तटाटे, हालवी ब्रह्मांड लांगुलें हो ।
राक्षस ह्मणतीं भक्षक, शिक्षक झाली गोलांगुलें हो ।
आत्मा कुलक्षय पाहुनि, रावण मोडित शत अंगुलें हो ।
प्राणमित्र ह्मणे टाकुनि,अहिमहि गेले यमसदना हो ॥जय०३॥

पडतां रार्णी लक्ष्मण, वेगें द्रोणागिरी आणिला हो ।
चार वेळ रात्रींतून, गेला आला गेला अला हो ।
सीता हरता मरता, भरता सरता जय पावला हो ।
राम सिता सौमित्रा, मारुति सप्राण भावला हो ।
भवबाधेची तोडी, विष्णूदासाची कल्पना हो ॥जय० ४॥
ॐ । ॐ ॥ ॐ ॥!

## १०० आरती मारुतीची २ री

जयजय महाविर धीर चिरंजिव, मारुती बलभीमा ।
जनकसुता-भय-शोक-निवारण, कपिगण-विश्रामा ।
दशकंधर पुर दाहक प्रियकर, दाशरथी रामा ॥ जयजय ॥ धृ. ॥
जन्मतांचि पुढें नवल देखिलें, रक्तवर्ण नयनीं ।
बाळ क्षुधित तें फळ ह्मणुनि बळें, झेंपावें गगनीं ।
ग्रहणकाळ खग्रास केतुवत, रवि घाली वदनीं ।
समर करुनि अरि अमर भासिले, कारितां संग्रामा ॥ जय० १ ॥
कडाडिलें ब्रह्मांड झोंकितां, क्रोधें उड्डाण ।
क्षणमात्रें तळ मुळ उत्पाटुन, आणिला गिरि द्रोण ।
लक्ष्मणासह मृत रणकपिचा, जीवविला प्राण ।
खळ राक्षसकुळ सकळ धाडिलें, रविनंदन-धामा ॥ जय० २ ॥
वज्रतनू घनशाम विराजे, तेज प्रखर तरणी ।
अटिव जेठि निट कटि कासूटी, कुंडलेंदु करणी ।
मुगुट गळा हार भार डोलती, नुपुर द्वय चरणीं ।
सजल नयन पुट जलज वदन शशि, सज्जन सप्रेमा ॥ जय० ३॥

दुर्घट संकटें कोटि लोपती, देतां बुभुःकार ।
करुणासागर नत जनिं वागवि, ब्रीद अहंकार ।
विष्णुदास कर जोडुनि नमना, करि वारंवार ।
चरण गुणार्णव अगणित वर्णन, नकळे तव सीमा ॥ जय० ४ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १०१ आरती श्रीकृष्णाची

( चाल—इस तन धनकी )

श्रीकृष्ण गोविंद गोपाळ राधे । ओंवाळूं आरती मंगळानंदें ॥ध्रु०॥
रोहिणीसुत बळिराम अनंत । अनंत श्रीकृष्ण हा भगवंत ।
अनंत पुण्याचें फळ हें सुबुद्धें ॥ ओंवाळूं० ॥ १ ॥
ब्रम्ह सनातन भक्तपरायण । आला तुझ्या गृहीं अदि नारायण ।
धन्य तुझें बाई भाग्य यशोदे ॥ ओंवाळूं० ॥ २ ॥
धुंडिता सकलही ब्रम्हांड सृष्टीं । न पडेचि हा रवि-चंद्राचे दृष्टीं ।
नाढळे जपतप श्रुतिशास्त्र वादें ॥ ओंवाळूं० ॥ ३ ॥
सकळही गोपी गोपाळ गवळी । आनंदें येऊनि कृष्णाचे जवळीं ।
गर्जती जयजय मंगळवरदे ॥ ओंवाळूं० ॥ ४ ॥
श्रावण अष्टमी प्रति कृष्णपक्षीं । गर्जती श्रीकृष्ण जयकृष्ण पक्षी ।
सुरवर मुनिजन गोधन वृंदें ॥ ओंवाळूं० ॥ ५ ॥
गोकुळीं जन्मला हरी चक्रपाणी । जाहलें निश्चळ यमुनेचें पाणी ।
वाजती करटाळ मृदंग वाद्यें ॥ ओंवाळूं० ॥ ६ ॥
केशव माधव हे मधुसुदना । पंकजनेत्रा सुप्रसन्न वदना ।

दावी निरंतर चरणारविंदें ॥ ओवाळूं ७ ॥
जन्मला पुरुषोत्तम विश्वस्वामी । आनंदली सर्व पाताळ भूमी ।
जगीं धन्य विष्णूदास प्रसादें ॥ ओवाळूं ८ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १०२ आरती श्रीलक्ष्मीनारायणाची

जयदेव जयदेव, जय निगमाधारा ।
श्रीलक्ष्मीनारायण, प्रभु जगदोद्धारा ॥ धृ. ॥
किरीट कुंडलें मंडित, पीतांबर पिवळा ।
हिरवा तुळशीदळासह, शिरिं मरवा कवळा ।
केशरि गंध सुगंधित, पुष्पांच्या माळा ।
वामांगीं सुंदर रुप, क्षिरसागर बाळा ॥ जय० १॥
महाविर धीर उदारा, शुभमंगल वदना ।
अनंत गुण गंभीरा, आनंदघन सदना ।
न तुले चरण नखाग्रीं, तुझिया मधुसदना ।
जाणो यास्तव शिव त्या, जाळितसे मदना ॥ जय० २॥
भवसागर पुर तारक, पारक गोविंदा ।
अविलंबें दाखवी निज, चरणारविंदा ।
परम कृपावन तूंचि, तुज सम मुकुंदा ।
निद्रित असतां दर्शन, दिधलें मुचकुंदा ॥ जय० ३ ॥
उजळुनि उत्तम धुपदिप, ओवाळूं आरती ।
येवो लक्ष्मीपतीचा, करुणार्णव भरती ।

पतीतपावन हें ब्रिद, धरिता या अर्थी ।
विष्णूदास ह्मणे तरी, तरुं शर्तीशर्ती ॥ जय० ४ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १०३ आरती श्रीसत्यनारायणाची.

जयजय श्रीगरुडध्वज, परमेश्वर प्रभु विश्वंभरणा हो ।
करुणामृत गुणगहना, आरती सत्यनारायणा हो ॥ धृ. ॥
सर्वोत्तम सर्वेषा, पुराणपुरुषा अंबुजनाभा हो ।
षड्गुणपदसंपन्ना, अनादिसिद्धा सकळारंभा हो ।
प्रल्हादास्तव वधिला, हिरण्यकश्यपु फोडुनि स्तंभा हो ।
परंतु श्रीभीमातिरिं, कटिं कर ठेउनि विटेवरि उभा हो ।
मुठभर पोह्यासाठीं, सुवर्णनगरि दिली ब्राह्मणा हो ॥ जय० १॥
धरणीधर तनुशय्या, निवास क्षीराब्धीं वैकुंठीं हो ।
विजयी कौस्तुभ कंठीं, लक्ष्मी वामांगीं गोरटी हो ।
उत्तम सुत परमेष्ठी, सुवर्ण पंचानन धुर्जटी हो ।
परंतु तुज नाम्याची, आवडे प्रेमानें शिळि रोटी हो ।
प्रेमाचा भुकेला, जिवलग विदुराचा पाहुणा हो ॥जय०२॥
निवटुनि दैत्य कुळाला, निजपद दिधलें त्यां शक्राला हो ।
गजेंद्र जड उद्धरिला, चक्रें विदारुनि नक्राला हो
परंतु गोकुळिं खासी, चोरुनि गोपींच्या तक्राला हो ।
वक्रा नार रमेहुनि, कुब्जा गमली अंतःकरणा हो ॥जय०३॥
सनकादिक मुनि नारद, वाल्मिक व्यास श्रीमुनि ग्रंथीं हो ।
वर्णिती साम सरस्वति, अखंड गाती सद्गुण कीर्ति हो ।

परंतु कलियुगीं भावें, नामस्मरणें जड जिव तरती हो ।
लभती सद्य फलश्रुति, करिती पूजन व्रत आरती हो ।
विष्णूदास ह्मणे हो, प्रसन्न तापत्रय हारणा हो ॥जय० ४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १०४ आरती श्रीचिन्मयानंद गुरुमालिकेची

जयजय चिन्मय आदिनाथ गुरु, परब्रह्म लिंगा ।
प्रणवस्वरूपिणी शिष्य शिरोमणी त्रिवेणि भवभंगा ।
त्रिगुणात्मक त्रयमूर्ति प्रगटल्या, तापत्रय भंगा ।
ओवाळूं धुप दीप निरांजन, आरती निजरंगा ॥जय० १॥
सहज समाधी ब्रम्हानंदीं, दृढ उन्मनी मुद्रा ।
घट मठ पट चट व्यापुनि होशि न, दर्शित रविचंद्रा ।
ढळसि न चळसि न अढळ अढळसि, कळसि न योगेंद्रा ।
अगमा निगमा आणिमा महिमा, मनश्रुतिपारंगा ॥जय० २॥
प्रसिद्ध सहजानंदस्वामि श्री, गोचर भागिरथी ।
ब्रम्हानंद सरस्वति यमुना, पूर्णानंद यती ।
नामश्रवणें पतित पातकी, जडमुढ उद्धरती ।
प्रणव स्वरूपिणी शिष्य शिरोमणी, त्रिवेणि त्रयगंगा ॥जय० ३॥
तूं कुंडलिनी आदिमाया मूळ, सकळ कलाधारा ।
तुजपासुनिया वाहती बहात्तर, सहस्त्रामृतधारा ।
लाउनि ज्ञानांजन दाविसि रुप, हा गुरु-गृह-धारा ।
सहस्त्र कमळदळीं ओपिसी परमा-मृत जिव-शिव-भृंगा॥जय.४॥
जय औदुंबर क्षेत्रनिवासा, श्रीसद्गुरुराया ।

युगायुगीं तूं जगिं अवतरसी, जगदोद्धारा या ।
तूं गुरु धरणीवर तरणी भव,-सागर उतराया ।
तूं आदि नारायण गुरुनाथा, तापत्रय भंगा ॥ जय० ५ ॥
श्रीगुरु सहजानंद सच्चिदानंदाचे स्वामी ।
स्वामि सच्चिदानंदापासुनि, दीक्षा शिवरामीं ।
शिवरामाई पासुनि नित्यानंदीं विश्रामी ।
नित्यानंद प्रसादें 'पुरुषोत्तम' निजपदिं जागा ॥ जय० ६॥
ॐ !!! ॐ !! ॐ !!!

## १०५ आरती श्रीगोचरस्वामी ( सहजानंदा ) ची

जयजय श्रीसद्गुरु श्रीगोचरस्वामी सहजानंदा हो ।
संपुजनार्चन करूं आरती सच्चिद्घन आनंदा हो ॥ध्रु.॥
रत्नखचित सिंहासन त्रिकोण माणिकपीठा वरती हो ।
पद्मासनिं बैसलि मंगळ स्नाना श्रीगुरुमूर्ती हो ।
चर्चिती उटणें अंगा न्हाणिती गंगा भागिरथी हो ।
वेदश्रुति गर्जती चौघडे वाजंत्री वाजती हो ।
सुरगण पुष्पें वर्षति वंदिती सन्मुनि पदारविंदा हो ॥ जय.१॥
दंड कमंडलु कंथा टोपी सैली कंकण वाकी हो ।
कौपिन कुंडल माळा कुंकुम काजळ नथ सर नाकीं हो ।
सकळ कळा गुणमंडित नट नर नरेश्वरी नसे बाकी हो ।
नारायण नारायाणि श्रीकुलस्वामिणी जगदंबा कीं हो ।
दाखवि अनंत लीला आदि मुळमायेचा हा धंदा हो॥जय.२॥

वरणी तळवट भाजन भोजन प्राशन मुख संपुटीं हो ।
उदंड ब्राह्मण पंगति पावती तृप्तीं श्रीगुरु मठीं हो ।
दुग्ध दधि घृत शर्करा नाना पक्कान्नें गोमटीं हो ।
क्षीर सुधारस शिकरिणी आम्ररस सार कढी आमटी हो ।
फल तांबुल दक्षिणा रिद्धि सिद्धी सुख संपदाहो ॥ जय. ३॥
श्री औदुंबर क्षेत्रीं संतसमागम सहजानंद हो ।
पुराण कीर्तन भजनें अवघा आनंदीआनंद हो ।
जिकडे तिकडे म्हणती राधे गोविंद गोविंद हो ।
पाहतां तुटे भवबंध विधिची लेखणी होई बंद हो ।
विष्णुदास म्हणे मि लाभलों श्री पुरुषोत्तम तत्पदाहो ॥जय. ४॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १०६ आरती श्री गोचरस्वामींची

जयजय सहजानंद कृपाघन श्रीगुरु गोचरस्वामी हो ।
सिद्धाश्रम पुण्यस्थळ निर्मळ श्री औंदुंबर ग्रामीं हो ॥ धृ० ॥
श्रीगुरुचा मठ प्रगट घटोद्भव भवसागर आटवी हो ।
केवळ कल्पतरु मुळ फळ जळहिन कंटक आटवी हो ।
पतित पातकी अति जड मुढ नर मोक्षपदीं बैसवी हो ।
प्राक्तन रेषा कटवी घटवी दुरवर हटवी सटवी हो ।
पावती समपद साधु असाधुहि जन कामुक निष्कामी हो ॥१॥
कालिंत अधर्मामुळें धर्माचें आवर्षण हें पडलें हो ।
या कारणें प्रतिपाळ कराया क्षिति अवतरणें घडलें हो ।

' अनाथ झालें दुःखें पराधिन गोब्राह्मण पीडिले हो ' ।
मुक्तद्वार मग अनपूरणेचें मंदिर त्वां उघडिलें हो ।
षड्स दधि मधु क्षिर घृत वर्षुनि संतर्पिलिसे भूमी हो ॥२॥
सिद्ध चिन्मयानंद चतुर्थाश्रम सद्गुरुची दीक्षा हो ।
संपादुनि भूमंडळीं भ्रमती अवलंबुनिया भिक्षा हो ।
अखंड जगदोद्धार करावा हीं दृढ धरिसी अपेक्षा हो ।
अन्नदानचि श्रेष्ठ यज्ञ हा आन नसे यापेक्षां हो ।
गुरु पारायण गुरु नारायण श्रीगुरु चिन्मय नामीं हो ॥३॥
अनुहत झडति मृदंग चौघडे वाजतसे वाजंत्री हो ।
भजन पुजन हरि पुराण कीर्तन गायन दिन आणि रात्रीं हो ।
तिष्ठति ऋद्धि सिद्धि सदांगणिं सुरमुनिसह गायत्री हो ।
मिरविति हरिहर विधिसह लक्ष्मी पार्वतीसह सावित्री हो ।
विष्णुदासाप्रति ' पुरुषोत्तम ' नामें दिली विश्रामी हो ॥४॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १०७ आरती श्रीब्रह्मानंद ( तुकाराममहाराज येहळेगांवकर ) यांची

जयजय ब्रह्मानंद सरस्वती । ओवाळुं सद्भावें सद्गुरुमूर्ती ॥ धृ. ॥
सहस्रकमळदळ पत्रीं विराजे । वंदिती महायोगी सन्मुनी राजे ।
वर्णिती निगमागम गुण कीर्ती ॥ ओवाळुं० ॥१॥
श्रीसच्चिद्घन नाथ निरंजन । निर्गुण निःसंग भव-भय-भंजन ॥
षड्गुणवर्धन षड्चक्रवर्ती ॥ ओवाळुं० ॥२॥

रत्नजडित सिंहासनमंडित । कुंडलिनी झळके आखंडित ॥
स्वस्थान येहळे ग्राम सुवस्ती ॥ ओवाळुं ॥ ३ ॥
दशविध घनघोष दुंदुभी वाजे । प्रांजळ उघडती दश दरवाजे ।
सुरवर गण पुष्पांजुळी वर्षती ॥ ओवाळुं ॥४॥
श्रीगुरु नारायण नारायण । गुरु पारायण ब्रह्म परायण ।
धुप दिप पुजनार्चन जन करिती ॥ ओवाळुं ॥ ५ ॥
याचक चातक वदनीं उदारा । वर्षवी करुणामृत-घन-धारा ।
विष्णुदास ह्मणे हेचि विनंती ॥ ओवाळुं ॥६॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १०८ आरती श्रीसच्चिदानंदस्वामींची ( आरती भुवन० )

अभिवंदन सद्‌गुरुपाया । सच्चिदानंद स्वामिराया ॥ धृ. ॥
पूर्वापर विकल्प संकल्पें । लोटलीं कल्पाचीं कल्पें ।
भवाटविं दुष्ट नष्ट पापें । टाकिलीं जाळुनि अनुतापें ।
चाल—कामक्रोधादिक शिरजोर । प्रतापें अखिल निवाटिले चोर ।
तोडिली थाट, झाडी घनदाट, फोडिला घाट, लागली
वाट सदुपाया ॥ सच्चिदानंद० १॥
अगोचर गोचर स्मरगामी । भेटले श्रीसद्‌गुरुस्वामी ।
सिद्धपिठ औदुंबर ग्रामीं । लाभली अखंड विश्रामी ॥
चाल—सहजानंदामृत रस तटिं । सुशोभित कल्पद्रुम तळवटिं ।
सहज आनंद, लागला छंद, राधेगोविंद, जाहली अजरामर
काया ॥ सच्चिदानंद० २॥

शिष्य आणि श्रीगुरु प्रत्यक्ष । भासती मत्स्येंद्र गोरक्ष ।
गोब्राह्मण रक्षक दक्ष । उभयतां समान समपक्ष ॥
चाल—अथवा किन्नर नारायण, वर्णिती सुरगण पारायण ।
शत्रु सरसगट, वधाया लगट, जाहले प्रगट, भक्तजनसंकट
वाराया ॥ सच्चिदानंद० ३ ॥
हरिहर गंगातट क्षेत्रें । स्थळो स्थळीं अन्नदान छत्रें ।
दक्षिणा कनक धान्य वस्त्रें । पुष्पहार तुळशीदळ पत्रें ।
चाल—समाधि मध्यस्थानिं चिन्मय । दोहिंकडे दोघे जयविजय ।
स्मरती सत्कीर्ति, पुजिति त्रैमूर्ति, करिती जन आरती,
सुखदपद ' पुरुषोत्तम ' गाया ॥ सच्चिदानंद० ४ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १०९ आरती श्री शिवरामस्वामींची १ ली.

जयदेव जयदेव जय गुरु शिवरामा ।
ओवाळुं आरती जिव शिव विश्रामा ॥धृ०॥
महा पुण्यस्थळ निर्मळ, औदुंबर ग्रामीं ।
आदिगुरु चिन्मय मठ, सिद्धाश्रम भूमीं ।
प्रथम शिष्य विराजित, गुरु गोचर स्वामी ।
शिष्य शिरोमणि त्यांचे, शिवराम नामीं ॥जय० १॥
अखंड पूर्वाश्रमिं रत, गुरुपद सेवाया ।
जाउं न देई अर्ध क्षण, आळसें वाया ।

प्रदोष काळीं बैसे, प्रसाद सेवाया ।
समान तक्र कण्या मिठ, गुण क्षिर सेवाया ॥जय० २॥
ताराया जींवा जड, भरतचि अवतरला ।
असूनि पूर्वज्ञानी, भवसागर तरला ।
भेटवि जींव शिवासी, बहु दिन अंतरला ।
अनाथ पतित जनांचा, भवपट कातरला ॥ जय० ३॥
स्वकरें श्रमित जनांचें, शरीरपट धोई ।
ह्मणुनी ह्मणती सज्जन, शिवराम आई ।
प्रगटली दीन दयाघन, श्रीअंबाबाई ।
विष्णूदास निरंतर, लागतसे पायीं ॥जय० ४॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

**११० आरती श्री शिवरामस्वामींची २ री** (आरती ज्ञानराजा)

आरती शिवरामा । जगजिवाच्या विश्रामा ॥धृ०॥
सच्चिदानंद पायीं-पूर्ण लाभली कमाई । केवळ अंबाबाई,
शिवरामाई रमाई । सद्गुरु गृहकामा-नाहीं क्षणही रिकामा॥आरती० १॥
श्रमोनि निजचरणीं । केली पवित्र धरणी ।
अखंड ज्ञानतरणी । भवसागर तरणी ।
चिंतितां तव नामा । काय शिकणें ओनामा ॥आरती० २॥
आजन्म ब्रह्मचारी । वंदिताति वेद चारी ।
प्रसन्न मदनारी । समरूप नरनारी ।
औदार्य शांति क्षमा-नसे शांतिसी उपमा ॥आरती० ३॥
सच्चिदानंदस्वामी । दिक्षा संन्यास आश्रमीं ।

ॐकार हंसो ऽ हं मी-सिध्द मुळपीठ भूमी ।
अपार गुण सीमा-गुणी न कळे निगमा ॥आरती० ४॥
प्रणिता तीरवासा । निज समाधिनिवासा ।
रक्षिसी निजदासा । निर्वाणीं हा भरंवसा ।
आनंद पुरुषोत्तमा । देई अखंड रामा ॥आरती० ५॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

# अष्टकें देवींचीं

--* ॐ *--

## १११ अष्टक रेणुकेचें

( कामदा

श्रीकृपानिधे विश्वनायके ।
हे भवानि ! सौभाग्यदायके ॥
प्रार्थितों तुला मी पदोपदीं ।
रेणुके ! मला पावसी कधीं ? ॥१॥
पापि मी तुझ्या द्वारिं तिष्ठतो ।
येउं दे कृपा फार कष्टतो
आटली कृपेची नसे नदी ॥रेणुके० २॥
लागलीस तूं कां दडावया ।

धांव लागलों मी बुडावया ॥
नावरोचि संसार वारधी ॥रेणुके० ३॥
काम क्रोध हे मान मोडिती ।
प्राणसंकटा-माजि पाडिती ॥
ओढिती जसे फासि पारधी ॥रेणुके० ४॥
चिंतनेंत आयुष्य दाटलें ।
पंच प्राण कंठांत दाटले ॥
क्षीण जाहली शक्ति आगदीं ॥रेणुके० ५॥
अंतकाळिं हा शत्रु आगळा ।
कापिल्याविना राहिना गळा ॥
पीडितात ि व्याधी शतावधी ॥रेणुके० ६॥
हें अमूल्य तारुण्य वेंचलें ।
हें समीप वार्धक्य पोंचलें ॥
काय ऊरलीं सांग आवधी ॥रेणुके० ७॥
चित्तिंची आशा चित्तिं राहिली ।
वाट म्यां तुझी फार पाहिली ॥
सार कां ? न ये मंथितां दधी ॥ रेणुके० ८ ॥
यावया दया लागेना क्षण ।
अंगिं हें तुझ्या माय लक्षण ॥
गर्जुनी स्वयें साक्ष दे विधी ॥ रेणुके० ९ ॥
पावली कृपेनें कृपावती ।

विष्णुदास हीं देत पावती ॥
नामकीर्तनीं भक्ति दे सुधी ॥ रेणुके० १० ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## अष्टक रेणुकेचें

( दिंड्या )

माझि पतिताचीं, पापकृती खोटी ।
तुझी पावन करण्याचि शक्ति मोठी ॥
समजवंता मी, काय समजाऊं ।
ऊठ अंबे ! तूं झोंपि नको जाऊं ॥१॥
जरी गेलिस तूं मायबाइ झोंपी ।
तरी बुडतिल भव,-सागरांत पापी ।
ब्रह्मज्ञानी हीं, लागतील वाहूं ॥ ऊठ० २ ॥
कामक्रोधादिक, चोरटे गृहांत ।
शिरुनि पडले ते, दुष्ट आग्रहांत ॥
लुटूं म्हणती हणुं, मारुं जीव घेऊं ॥ ऊठ० ३ ॥
काळसर्प मुख, वासुनी उशाला ।
टपत बसला तो, भीइना कशाला ॥
कितीतरि या निर्वाणि तुला बाहूं ॥ ऊठ० ४ ॥
कृपा सोडुनि निजलीस यथासांग ।
उपेक्षीसी मज, काय अतां सांग ।

कृपावंते ! निष्ठूर नको होऊं ॥ ऊठ० ५ ॥
तुझ्याविण मी कोणासि हात जोडूं ।
आइ ह्मणुनी, कोणाचा पदर ओढूं ॥
तुझे पाय सोडूनि कुठें जाऊं ॥ ऊठ० ६ ॥
जगीं त्राता तुज,-वीण कोणि नाहीं ।
माझि कोणी कळवळ जाणिनाही ॥
तूंच जननी तूं, जनक बहिण भाऊ ॥ ऊठ० ७ ॥
नको सांड करुं, माझिया जिवाची ।
तुला एकविरे ! आण भार्गवाची ॥
नको सहसा जगदंबे अंत पाहूं ॥ ऊठ० ८ ॥
जरी माझी ना, करिसि तूं उपेक्षा ।
तरी वाढेल तुझें नांव याहिपेक्षां ॥
विष्णुदास ह्मणे, गूण तुझे गाऊं ॥ ऊठ० ९ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ११३ अष्टक रेणुकेचें (भु० प्र० )

तुझीं आसती कोटि ब्रह्मांड बाळें ।
तसें घेइ पोटीं मलाही दयाळे ॥
नको दूसऱ्या गर्भवासासि धाडूं ।
नको रेणुके ! आपुलें ब्रीद सोडूं ॥ १ ॥
तुझ्या वांचुनी होतसे जीव कष्टी ।

तुला एकदां पाहुंदे माय दृष्टीं ॥
नको प्रीतिचा लाविला कोंभ मोडूं ।
नको रेणुके ! आपुलें ब्रीद सोडूं ॥ २ ॥
समर्थागृहीं इष्ट शिष्टाधिकारी ।
तया पंगतीं बैसलीया भिकारी ॥
नको अन्नपात्रामधें भिन्न वाढूं ।
नको रेणुके ! आपुलें ब्रीद सोडूं ॥ ३ ॥
जपोनी तुझें नांव मोठें प्रतापी ।
बुडाला जगीं कोणता सांग पापी ॥
नको येकट्याला मला खालिं धाडूं ॥
नको रेणुके ! आपुलें ब्रीद सोडूं ॥ ४ ॥
तुझ्या भेटिची लागली आस मोठी
परी दुष्ट येती आडवे शत्रु कोटी ।
नको भीड त्यांची धरूं माझि तोडूं ।
नको रेणुके ! आपुलें ब्रीद सोडूं ॥ ५ ॥
तुझा पुत्र हा वाटल्या तारणें हो ।
तुझा शत्रु हा वाटल्या मारणें हो ॥
नको तीसरा याविणें खेळ मांडूं ।
नको रेणुके । आपुलें ब्रीद सोडूं ॥ ६ ॥
पुरे झालि ही नांवनीशी कवीता ।
रसाभास होतो, बहू शोकवीता ।
मना माउलीला नको व्यर्थ भांडूं ।
नको रेणुके ! आपुलें ब्रीद सोडूं ॥ ७ ॥

अह्मी लेंकरांनीं रडावें रुसावें ।
अमा देउनी त्यांचि डोळे पुसावे
नको कायदा हा तुझा तूंचि फाडूं ।
नको रेणुके ! आपुलें ब्रीद सोडूं ॥ ८ ॥
गडे ! येउनी तूं कडे घे मुक्यानें ।
करी शांत आलिंगुनीया मुक्यानें ।
नको विष्णुदासाप्रती तूं विभांडूं ।
नको रेणुके ! आपुलें ब्रीद सोडूं ॥ ९ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

११४ अष्टक रेणुकेचें (भुजंगप्रयात)

नमो आदि गौरीसुता एकदंता ।
नमो शारदा सद्गुरू ज्ञानदाता ॥
नमो आदिशक्ती महीषासुरारी ।
अतां रेणुके ! दुःख माझें निवारी ॥ १ ॥
तुला चिंतिल्या पावती मोक्ष प्राणी ।
अशी गर्जना व्यासवाणी पुराणीं ।
महाद्वाड हा एवढा पापि तारी
अतां रेणुके ! दुःख माझें निवारी ॥ २ ॥
अगा जाहलीसी अनाथाचि आई ।
म्हणूनी तुला प्रार्थितों मी तुकाई ॥
करी कींव कीं गांजिलों संवसारी ।
अतां रेणुके ! दुःख माझें निवारी ॥ ३ ॥

जगन्नायके ! आयके एक आतां ।
उणें काय होतें मला अल्प देतां ।
बहू जन्मिचा मी तुझा ऊपकारी ।
अतां रेणुके ! दुःख माझें निवा[illegible]

अराधीत मी दास तूझा अराधी ।
करावी कृपा त्याहुनी आपराधी ।
कृपा जोगवा दान मागे भिकारी ।
अतां रेणुके ! दुःख माझें निवारी ॥५॥

नको येउं कोपा कृपादृष्टि पाहे ।
मला आसरा दूसरा कोण आहे ।
तुला लाज माझी तुझी आस सारी ।
अतां रेणुके ! दुःख माझें निवारी ॥६॥

अझूनि कशी पाहसी नीरवाण ।
पहा माझिया दाटला कंठिं प्राण ॥
जिवा त्रासलों पावलों कष्ट भारी ।
अतां रेणुके ! दुःख माझें निवारी ॥७॥

श्रीदेवि जयदेवि जय जय भवानी ।
महादेवि तूं माय कैवल्यदानीं ।
स्तुती विष्णुदासाचिही आवधारी ।
अतां रेणुके ! दुःख माझें निवारी ॥८॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ११५ अष्टक रेणुकेचें ( पृथ्वी छंद )

श्रिमंत गुणवंत तूं, सदय मंगलालंकृत ।
पसंतिस तुझ्या नये, स्तवन दूबळें प्राकृत ॥
निजस्तवनिं टेकिलीं, पदिं सहस्रही मस्तकें ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥१॥

अशुद्ध स्तवनाक्षरें, ह्मणुनि बोबडीं तोतरीं ।
तुला न रुचती जरी, समुळ हीं खुडीतों तरी ॥
मुकेंचि स्तन चाखितें, आरडतें भुकें बोलकें ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥२॥

जगीं न मिळली मला, सुशिल संगती वाटती ।
पुढें मज न चालवें, मनिं तुझी भिती वाटती ॥
परंतु तव चिंतनें, त्रिविध जाळिं तूं पातकें ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥३॥

तुलाचि तुजसारखें, जननि नांव हें शोभलें ।
समान जगिं पाहसी, जड मुढादि ज्ञानी भले ॥
उदंड मज सारखे, पतित तारिले कौतुकें ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥४॥

* न देचि निजगुप्त तें, धन पिता कुपुत्रा-करीं ।
जगांत अश्वा जसा, निजगृहांत कुत्रा करी ॥
परंतु जननी अर्धी, अधिक देत त्या भातुकें ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥ ५ ॥
सुपात्रहिन वंचना, करि गुरूहि दत्तात्रय ।
तशीच गृहदैवतें, विविध देति नापत्य ॥
तुलाचि खळ पातकी, पटति अंध पंगू मुके ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥ ६ ॥
निराश्रित मि लेंकरूं, तरि नको उपेक्षा करूं ।
तुझ्या भुवनिं जिंकिती, हंसति कल्पवृक्षा करूं ॥
कृपामृत झरे सदा, स्रवति नित्य आराणुके ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥ ७ ॥
तुझीं विमल पावलें, परम सुकृतें पाहिलीं ।
अनंद सरिता जळीं, विषयवासना वाहिली ॥

---

* मोरोपंताची केका याच अर्थाची आहे. यांत मातृउपासनेची महती वर्णिली आहे.

पिता जरि विटे, विटो; न जननी कुपुत्रीं विटे; ।
दयामृतरसार्द्रधी न कुलकजलें त्या किटे[१]; ॥　　१ मळत नाहीं
प्रसादपट झांकिती परि परा गुरूचें थिटे[२]; ।　　२ आखुड-तोकडें
ह्मणूनि ह्मणती भले न ' ऋण जन्मदेचें फिटे '. ॥९५॥

१ एका वृक्षाचें नांव

विशेष मम मस्तकीं, अभयदान दे हस्तकें ।
म्हणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥ ८ ॥

सुकीर्ति तुझि चांगली, अवडली अह्मा गावया ।
अशा धरुन मी अलों, उचित दान मागावया ॥
प्रसादफळ दे असें, सतत विष्णुदासा निकें ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥९॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## ११६ अष्टक देवीचें ( शिखरिणी )

नमस्ते श्रीअंबात्मज गणपती ब्रह्मकुमरी ।
नमस्ते श्रीविद्यावदन कमलानंद भ्रमरी ॥
नमस्ते श्रीदत्तात्रय गुरु कृपासागर मुनी ।
नमस्ते श्रीअंबे विजयि परशूरामजननी ॥१॥
भवान्ध:कारान्ता, प्रगटलि महारत्न दिपिका ।
अयोनीसंभव्या, सकल गुणमंडीत लतिका ।
स्वयं भंगा रंगा, सगुणरुप लावण्य अवनी ।
नमस्ते श्रीअंबे, विजयि परशूरामजननी ॥२॥
निघाली यज्ञाच्या, सजिवन कला अग्निमधुनी ।
वसे सिंहाद्रींही, दशशतकरालागिं वधुनी ॥
विराजे सद्भक्तांकित भगवती याज्ञशयनी ।
नमस्ते श्रीअंबे, विजयि परशूराम जननी ॥३॥
पिता रेणूराजा, रुचिक तपराशी श्वशुर तो ।
महा उग्र क्षोभी, रमण जमदग्नीच हरतो ॥

जिच्या जन्मांत्राच्या, त्रिभुवनिं सुता बंधुभगिनीं ।
नमस्ते श्रीअंबे, विजयि परशूरामजननीं ॥४॥

पतीतोद्धाराया, सुखकर भवाब्धींत नवका ।
\+ जिच्या दैत्यानाशें, सुरवरगणालागिं तवका ॥
अई रेणूकाही, प्रबल महिषासूर मथनी ।
नमस्ते श्रीअंबे, विजयि परशूरामजननी ॥५॥

जगूं वत्सासाठीं, टपत विजनीं धेनु बसली ।
न येतीं कां कोणी, ह्मणुनि मनिं कीं काय रुसली ॥
अपापें पान्हावें, मुळपिठ निरालंब अवनी ।
नमस्ते श्रीअंबे, विजयि परशूरामजननी ॥ ६ ॥

गळा माळा पीतांबर भरजरी रंग पिंवळा ।
उरस्थ प्रेमाच्या, उदधिंत मनोभाव कवळा ॥
इच्या वाटे कोटी, हरपति रवी चंद्र वदनीं ।
नमस्ते श्रीअंबे विजयि परशूरामजननी ॥ ७ ॥

कृपाब्धीचो वाहे, क्षितितळवटीं वत्सलहरीं ।
पतीतांची सारीं, दुरित मलपापें परिहरी ॥
करी विष्णूदासा, अळस त्यजुनीं पावन जनीं ।
नमस्ते श्रीअंबे, विजयि परशूरामजननी ॥ ८ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

---

\+ पाठभेद.—१ 'जिचा दैत्यागार्थी' २ जिच्या दैत्यांगार्था

## ११७ अष्टक रेणुकेचें ( शा० वि० )

श्रीअंबे ! जय रेणुके ! गुणनिधे, सौभाग्य सूवासिनी ।
मुक्तालंकरणें सुगंध सुमनें, श्रीमूळ पीठासनी ।
आनंदें बसलीस खुंटुनि भवांबोधींत जैसी तरी ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरी ॥१॥

दुःखाचे वरच्यावरी ढसळती, अंगावरी पर्वत ।
चिंतेचा दिनरात्रहीं करकरा, वाजे शिरीं कर्वत ॥
आशा वाढत चालली स्थुळ जशी, जीर्णोदरीं पान्थरी ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरी ॥२॥

माते ! मुख्य तुं सूत्रधार तुझिया, सूत्रें अम्ही माकडें ।
आहों नाचत सत्य लाविसि बळें, कां दोष आम्हांकडे ॥
अज्ञानी म्हणवून देशि कशि तूं, लोटोनि दुःखांतरीं ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरी ॥३॥

थोरांच्या पदरांत चूक दुबळें, घालूं नये घालणें ।
संतापें भलतें प्रसंगि अगळें, बोलूं नये बोलणें ॥
ही बुद्धी कळते परंतु सलतें, पोटामधें कातरी ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरी ॥४॥

जों जों मी करितों विनंति जननी ! तों तों कठोराधिक ।
होशी यास्तव वाटतो खचितची, संसार सारा धिक ॥
माझी कांहिं दया बया, तुज नये, वाटे मनीं खातरी ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरी ॥५॥

अद्यापी निगमादि व्यास वचनें, नाहीं क्षिती सोडिली ।
अद्यापी पतितांचि वाट तरण्याची नाहिं कीं मोडिली ॥
अद्यापीं मज पावसी न स्तवितां, आलें जरा सत्तरी ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरीं ॥६॥
काढावें परि कर्दमांत पडल्या, मागें करूं ने हत ।
शिक्षा देउनि बाळकासि ह्मणणें, कोपें अईनें हत ॥
दुःखिष्टासि न दुःख देति कळते, खोंचूनि वर्मांतरीं ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरी ॥७॥
अंबार्धक्षण पादपंकज मला, तूं दाखवी एकदां ।
कल्पांतीं म्हणणार नाहिंच पुन्हां, मी संकटीं ये कदां ।
कोंडूनीं हृदयांत ठेविन जशी, विद्युल्लता अंतरीं ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरी ॥८॥
विष्णूदास म्हणे जिच्या निजकृपें मात्रा पदें लाभलीं ।
नाहीं कोण म्हणेल पामर अशा, त्या जन्मदेला भली ॥
माते, बोलविसी तुं बोल म्हणुनीं, राहूनियां अंतरीं ।
भो नारायणि ! माय काय तुजला, आतां म्हणावें तरी ॥९॥
ॐ । ॐ ॥ ॐ ॥।

## ११८ अष्टक रेणुकेचें ( शिखरिणी )

न द्यावी कां वाटे, पतित म्हणुनी भेट मजला ।
न ध्यावी कां वाटे, खबरहि अनाथाचि तुजला ॥
नतोद्धारायाचीं, सय अझुनि कां येउंच नये ।
अगाई रेणूके ! किति दिन असें बोलुंच नये ॥१॥

म्हणेना बाई ये, जवळ पिपिलिके शर्करा ।
म्हणेना अंगासी, मर्दन मला केशर करा ॥
तसें बुध्द्या येणें, मज तुजकडे भाग पडतें ।
अगाई रेणूके ! मजविण तुझें काय अडतें ॥२॥
अनंदे तूं भेटी, खचित मज देशील म्हणुनी ।
अनंदें मीं होतों, अजवर अयुष्यासि गणुनी ।
निदानीं राहीला, मरणलग हा वाद शिलकीं ।
अगाई रेणूके ! कशि तुं निगमा वादशिल कीं ॥३॥
उपेक्षा दीनाचीं, करतिस तुझी बाइ मरजी ।
नसे जागा द्याया, तुजवर अर्पीलाचि अरजी ॥
दया माया कांहीं, मजविषयीं चित्तांत नसुं दे ।
अगाई रेणूके ! अठवण तुला माझि असुं दे ॥४॥
अनावृष्टीनें[1] या, मरातिल किती जीव न कळे ।
तुझीं हीं जीं बाळें, जगतिल किती जीवनकळे ॥
कसें झालें ? आलें, प्रलयसम हें वर्ष विघ्न[2] ।
अगाई रेणूके ! सदय हृदयें वर्षवि घन ॥५॥
जिलाहीं दीनाचीं, निगम म्हणती कल्पलतिका ।

---

१ एका वर्षीं पर्जन्य न पडल्यामुळें दुष्काळ पडला व जनतेचे फार हाल होऊं लागले त्यावेळीं हें कळवळ्याचे बोल निघाले. थोड्याच दिवसांत पर्जन्यवृष्टि होऊन आनंद झाला ही गोष्ट अद्याप कांहींचे स्मरणांत आहे.

२ विघ्न.

दिनाचा वेलीनें कवळुनी गळा कापिल ति कां !!
कशी झाली रक्षा-कर हयग्रिवा सायक रसी ।
अगाई रेणूके ! विपरित असें काय करसी ॥६॥

असोनी तूं माझ्या, हृदयिं फिरवीसी दशदिशा ।
कुटस्था लावीली, जनन मरणाची अवदशा ॥
सर्वेची म्हातारा, करुनि करिसी बाळ तरणा ।
अगाई रेणूके ! तुजजवळ ही कां प्रतरणा ॥७॥

करावें तें केलें, तिळभर उणें नाहिं पडलें ।
तुझ्या एक्य नामीं, सकलहि मला धर्म घडले ॥
कृपेचें राहीलें, उचित प्रिय देणें तुजकडे ।
अगाई रेणूके ! लवकर अतां घे मजकडे ॥८॥

अहो मी अन्यायीं, म्हणवुन उपेक्षा करुं नये ।
क्षमावंते, माते ! निजपथ क्षमेचा त्यजुं नये ॥
पतीतोद्धारायास्तव मिरविसी कंकण करी ।
अगाई रेणूके ! पतित मी अहों पावन करी ॥९॥

दिनाची तूं आई, अलिस दृढ आह्मां समजुनी ।
कृपादृष्टी ठेवी, निज परशुरामा समजुनी ॥
तरी दीनाला घे, जवळ स्तन देवोनि अननीं ।
अगाई रेणूके ! जरि तुं अससी दीन-जननी ॥१०॥

स्वयें विष्णूदासा-वदनिं वदवीसी शिखरिणी ।
जशी अंबा रंभा, मधुफळ रसाची शिकरिणी ।

तशी ही सद्विद्याक्षर शिकविशी बोधक मला ।
अगाई रेणुके ! नमन तुझिया पादकमला ॥११॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## ११९ अष्टक रेणुकेचें-अपराध क्षमापन-( चामर )

येक वेळ ही कधीं न, ब्रह्मवृंद वंदिले ।
सर्व काळ पुण्यवंत, साधुसंत निंदिले ॥
जाहली वडील सभ्य, सज्जनांचि मस्करी ।
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥१॥
ब्राह्मणाचिये कुलांत, श्रेष्ठ धर्म लाधला ।
भ्रष्टवोनि सर्व तो, प्रपंच मानिला भला ॥
तत्र पोषणार्थ केलि, दुर्जनांचि चाकरी ।
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥२॥
कामिनींत प्रेमयुक्त, चित्तवित्त अर्पिलें ।
मी क्षुधीत याचकांसि, भोजनें न तर्पिलें ॥
लाधले प्रपंच पात्रि, भेद दोष या करीं ।
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥३॥
काळजांत काळकूट, वीष शर्करा मुखीं ।
चिंतनेंत होत घातपात हात गोमुखीं ॥
साधनांहि साधलें मि, सोंगढोंग तस्करी ।
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥४॥
स्त्रीधनांत दुर्मदांत स्वगृहांत माजलों ।
वर्ततां अधर्मि कांहीं, स्वल्प नाहिं लाजलों ॥

पापपुण्य कर्दमांत, नाचलों जसा करी ।
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥५॥
सर्व काळ काम धाम, कामिं चित्त गुंतलें ।
तें तुझें भवानि नाम, येकदां न चिंतिलें ॥
दाविली जनासमोर, नाचवून वैखरी ॥
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥६॥
लौकिकार्थ पाठ केलिं, श्रीगुरूचिं अक्षरें ।
जेंवि कृष्ण यामिनींत, चमकताति नक्षरें ॥
तेंवि तीं न प्राप्त होतिं, शुद्ध ज्ञान भास्करी ।
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥७॥
मीं प्रचंड पातकें, प्रशस्त मानलीं हिता ।
चित्ति त्रासला असेल, चित्रगुप्त लीहितां ॥
प्रार्थनाहि अष्टश्लोकिं, स्पष्ट बोलिलों खरी ।
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥८॥
थोर पाप हें ह्मणून, साफ ब्रीद संपलें ।
हें म्हणावें काय माय, पाय दावि आपुले ॥
विष्णुदास दे ह्मणे, कृपाळु दृष्टि लेंकरीं ।
आपराध हे क्षमा तुं, माय रेणुके करी ॥९॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १२० अष्टक महाकालींचें ( शा. वि. )

जय जय विश्वपते, हिमाचलसुते, सत्यव्रते भगवते ।
वांच्छा कल्पलते, कृपार्णव धृते, भक्तांकिते, सन्मते ॥

साधू वत्सलते, अधर्मरहिते, सद्धर्म श्रीपालके ।
साष्टांगें करितों प्रणाम चरणा, जयजय महाकालिके ॥१॥
अष्टादंडभुजा प्रचंड सरळा, त्रिकाळ दाढा शुळा ।
रक्त श्रीबुबुळा प्रताप अगळा, ब्रह्मांड माळा गळां ॥
जिव्हा ऊरस्थळा, रुळे ळळळळा, कल्पांत कालांतके ।
साष्टांगें करितों प्रणाम चरणा, जयजय महाकालिके ॥२॥
कोटीच्या शतकोटि बाण सुटती, संग्राम प्राणार्पणें ।
तेंव्हां रूप प्रचंड देख भ्रमती, मार्तंड तारांगणें ॥
सोडीले तत्र सुप्रताप पाहतां, गर्वास श्रीत्र्यंबकें ।
साष्टांगें करितों प्रणाम चरणा, जयजय महाकालिके ॥३॥
युद्धीं चाप करीं फिरे गरगरा, चक्रापरी उद्धटा ।
आरोळीं फुटता धरा थरथरा, कांपे उरीं तटतटा ॥
साक्षात् काळ पळे बहू झरझरा, धाकें तुझ्या अंबिके ।
साष्टांगें करितों प्रणाम चरणा, जयजय महाकालिके ॥४॥
अंगीं संचरतां सकोप उठती, ज्वाळा मुखीं भडभडा ।
भूमी आदळतां द्विपाद उठती, शैले-मुळें तडतडा ॥
चामुंडे उररक्त तूं घटघटा, महिषासुर प्राशके ।
साष्टांगें करितों प्रणाम चरणा, जयजय महाकालिके ॥५॥
आशापाश नको, जगीं भिक नको, परद्रव्य दारा नको ।
कायाक्लेश नको, दया त्यजुं नको, निर्वाण पाहूं नको ॥
कामक्रोध नको, महारिपु नको, निंदा नको या मुखें ।
साष्टांगें करितों प्रणाम चरणा, जयजय महाकालिके ॥६॥

त्वद्भक्ती मज दे, भवानि वर दे, पायीं तुझ्या राहुं दे ।
सद्धर्मीं मति दे, प्रपंचि सुख दे, विघ्नें दुरी जाउं दे ॥
धैर्य श्री बल दे, सुकीर्ति यश दे, बाधो न दे पातकें ।
साष्टांगें करितों प्रणाम चरणा, जयजय महाकालिके ॥७॥
स्वापत्या छळणें कृपा विसरणें, अश्लाघ्य कीं हें अहा ।
तूझा तूंचि पहा विचार करुनीं, अन्याय कीं न्याय हा ॥
विष्णूदास ह्मणे कृपाचि करणें, आतां जगन्नायके ।
साष्टांगें करितों प्रणाम चरणा जयजय महाकालिके ॥८॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

---

## १२१ अष्टक दत्ताचें ( चामर )

यामिनीस शोभवीत, चंद्र तो प्रजापती ।
दूर वास आवतार, तोचि श्रीउमापती ॥
श्रीरमापतीच अत्रि, आश्रमांत राहिला ।
तो अनाथनाथ-दत्त, माहुरांत पाहिला ॥१॥
जो अखंड चंद्र श्रीमृगेंद्र नाम शीखरीं ।
जो पहावयासि होति, वासना मसी खरी ॥
म्यां वियोग-ताप त्या, चकोरतुल्य साहिला ।
तो अनाथनाथ-दत्त, माहुरांत पाहिला ॥२॥
मायही यदा कदा, पिता कुमार मारवी ।
सद्गुरूस हांसतील, कीं उमा रमा रवी ॥
जो कुठेंचि नीगमास, दीसला न गाइला ।

तो अनाथनाथ-दत्त, माहुरांत पाहिला ॥३॥
अर्जुना अधीक आपुल्याहिहून बाहु दे[1] ।
याचका उचीत दान दे बहूत बाहुदे ॥
जो सुरासुरें धराधरें नरेंहि गाइला ।
तो अनाथनाथ-दत्त माहुरांत पाहिला ॥४॥
धर्म अर्थ काम मोक्ष, ग्राम गाण गा पुर ।
श्रीगुरूचरित्रनाम, हेंचि गाणगा पुर ॥
नारसिंह श्रीसरस्वति स्वरूप जाहला ।
तो अनाथनाथ-दत्त माहुरांत पाहिला ॥५॥
ज्या कधींहि कष्टती न, पातकांसि तासिता ।
वांच्छिती सदैव पाद,-मृत्तिका सिता ऽ सिता ॥
जो समस्त योगज्ञानि, सन्मुनींनिं ध्याइला ।
तो अनाथनाथ-दत्त, माहुरांत पाहिला ॥६॥
जो रवीशशीस स्वप्रकाश रंग वर्णवी ।
जो प्रबोध-ज्ञान-सिंधुचे-तरंग वर्णवी ।
जो घटांत ही मठांत, भूपटांत लीहिला ।
तो अनाथनाथ-दत्त माहुरांत पाहिला ॥७॥
जो न लोटितांहि जाय, भक्त-लालसें दुर ।
जेंवि कां पटासि स्नेह, सक्त लाल सेंदुर ॥
कीं रुपज्ञ मानिताति आम्रवृक्ष कोकिला ।
तो अनाथनाथ-दत्त, माहुरांत पाहिला ॥८॥

---

१ सहस्त्रार्जुनास १००० हात दिले

जो अनंदकंद मंद,-हास्य मूख साजरा ।
पंकजासनीं गमोचि, नीलपंखसा जरा ॥
जो सुगंधगंध देत, पाच जाइ जूइला ।
तो अनाथनाथ-दत्त, माहुरांत पाहिला ॥९॥
जो त्रिगूणरूप पूर्ण, ब्रह्म आजरामर ।
ज्यासि सामरादि लोक, वारितार्ति चामर ।
जो अनूसुयेच्चिया निजूनि पार्थि नाहिला ।
तो अनाथनाथ-दत्त, माहुरांत पाहिला ॥१०॥
हे सुधाकरासि देति, पुष्टि श्लोक आकरा ।
कोण या नको ह्मणेल, पुण्यश्लोक 'आ'करा ।
विष्णुदास या कथामृतासि पिउनि धाइला ।
तो अनाथनाथ-दत्त माहुरांत पाहिला ॥११॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

### १२२ अष्टक-दत्ताचें ( शुद्धकामदा ).

जय नमोस्तुते श्री दिगांबरा ।
सद्गुरू निरूपाधि तूं बरा ।
उरुं न दोसि दैवाचि बाकि ती ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥१॥
सुकुळिं जन्म हा, लाभला मला ।
जरि तुझा न बा, लाभ लाभला ॥
तरि वृथा कृती, गेलि पांकिं ती ।

करुं विनंति दत्तात्रया किती ॥२॥
तुज ह्मणावया, लाज वाटती ।
मुळेंच चूकलों, मींच वाट ती ॥
परि तुझ्या सुरीं, मान ही हतीं ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥३॥
विषय वीष हें सोमलादिक ।
खचित वाटतें तें मलाऽधिक ॥
परि नसे दुजी, भक्षितां गती ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥४॥
जरि प्रपंच चिताग्नि पोळवी ।
तरिहि त्यामधें, मोह लोळवी ॥
विविध ऊठती, कल्पना भिती ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥५॥
कनक द्रव्य लावण्य कामिनी ।
चटक लागली दिवस यामिनी ॥
विषय ध्यानिं लाचावली मती ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥६॥
षड्विकार कामादि बापुडे ।
गमति काजवे बा ! तुझ्यापुढें ॥
दिनमणी तुं ये, ऊदयाप्रती ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥७॥
अठवितों तुला, मी ज्यऱ्हां ज्यऱ्हां ।

पळसि दुरचि कां, तूं त्यव्हां त्यव्हां ॥
स्तवन का नची कान ऐकतीं ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥८॥
निपट हा करावा विचारची ।
अनुसुया वडीलोपचारची ॥
मनिं अगून दात्याचि नेकि ती ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥९॥
करिसि भक्तिच्या, कागदा सही ।
ह्मणुनि प्रार्थितो, विष्णुदासही ॥
मज प्रसन्न हो, ऐकुनी स्तुती ।
करुं विनंति दत्तात्रया किती ॥१०॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १२३ अष्टक श्रीदत्ताचें (शा. वि.)

गेला बाळपणांत काळ क्रिडतां, तारुण्य आलें भरा ।
झालों मत्त मदांध कुंजर जसा, भ्यालों न विश्वंभरा ॥
रात्रंदीन परांगनेसि झटलों, तैसा पराच्या धना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥१॥
नाहीं या समयीं विशेष उरली, बोलावया आवधी ।
कामक्रोध प्रकोप दोष उठती, व्याधी सहस्रावधी ॥
वार्धक्याचि दशा नको जगदिशा, सोसूं किती वेदना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥२॥
कोणी सन्निध या विपत्तिंत कदा, येती न बापा खरें ।

वृक्षीं पत्र-फुलें-फळें तंववरी, लोळंगती पांखरें ॥
तैसे आप्त कलत्र मित्र अवघे, धिःकारिती निर्धना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥३॥
अद्यापीं रिपुच्या स्वदास पतितोद्धारा न यावा हतीं ।
अद्यापी जगतार्थ मेघ स्रवती, धारा नद्या वाहती ॥
अद्यापी तरुही परार्थ फळती, सूगंध ये चंदना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥४॥
संध्यातर्पण वैश्वदेव गुरुची, पूजा न औपासना ।
गावें नाम धरून नित्य हृदयीं, आहे परी वासना ॥
ती तूं मात्र कृपा करून पुरवी, कल्याण श्री वर्धना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥५॥
दुग्धामाजिहि पावेना सुख कधीं, पाण्याविना मासुळी ।
जाणों तो तप साधनेंचि बसला, मांडव्यनामा सुळीं ॥
भक्तीवांचुनि दुःखदायक गमे, नानाकृती साधना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥६॥
संतापें तुह्मिही ह्मणाल इतुका, कां वादतो आगळा ।
शत्रूचा क्षणमात्र नेम न कळे, कापील केव्हां गळा ॥
थोराची मरजी पटे न अरजी, फिर्यादिची दाद ना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥७॥
दाता दत्त ह्मणून लोक ह्मणती, आह्मी ह्मणूं ना तुला ।
आणूं साक्षिस वेद पत्रकसह, श्रीविष्णुच्या नातुला ॥
तुह्मी पावन सत्यची पतित हा, खोटा तरी बाध ना ।

स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥८॥
आनाथाप्रति साधुलोक अवघा, आहे पुराव्यास गा ।
तैसाची अठरा पुराणकरता, आहे पुरा व्यास गा ॥
आतां सोडुं नका परंतु अपुल्या, भो नाथ ! संबोधना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥९॥
माळा दंड करीं कमंडलु जटेचा मस्तकीं टोप तो ।
ब्रह्मांडांतरिं जो फिरेचि लपतो, भक्तांस आटोपतो ॥
भक्तीची दृढ चित्ति प्राप्ति करितां, युक्ती मला साधेना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥१०॥
यत्नें ना कळसी महा रणधिरा, श्रीलक्ष्मीनायका ।
बांधीती उखळीं परी सहजची, गोकूळिंच्या बायका ॥
ही शक्ती निजभक्ति लाउनि दिली, राखूनिया गोधना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥११॥
कांता कांचन राज्य वैभव नको, कैवल्यही राहुं द्या ।
होऊं द्या अपदा शरीर अथवा, काळासि हीराउ द्या ॥
पाहूं द्या रुप येक वेळ नयनीं, ही माझि आराधना ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥१२॥
दावी भक्तिच थोडिसी तरि नको, वैकुंठ कैलासही ।
मोठी दीधलि द्या विशेष गरुडा, तैसीच बैलासही ॥
विष्णूदास ह्मणे बरी यवढिसी, ये हिर्‌कणी कोंदणा ।
स्वामी दत्त दयाघना अवधुता, श्रीअत्रिच्या नंदना ॥१३॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १२४ अष्टक श्रीदत्ताचें (शिखरिणी)

कसा केला स्वांगें, क्षण न लगतां मोचन करी ।
कृपेनें थोडासा, तरि मजकडे लोचन करी ।
खुना-या नक्राची, तशिच पडली भीड तुजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥१॥
अजामेळाचाही, कुटिल रव कानीं झगटला ।
स्वपुत्राचें नामीं, तुह्मि उगि बळेंची प्रगटला ॥
खऱ्या नामाचा कां ? दवडुन अभीमान निजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥२॥
मुकाटींही केली, मुनि-वधु-शिळा पावन कशी ।
श्रिमंताची खोटी, पुतळि ह्मणती बावनकशी ॥
गरीबाचा माथा, सतत पदिं घासूनि झिजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥३॥
दिनानाथा आह्मां, तरि त्रिभुवनीं कोण असरा ।
पिता माता बंधू, तुजविण नसे देव दुसरा ॥
निराधारी एकादशिच गुरुराया ! निरजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥४॥
सुदाम्याला द्या जा, उचित न अह्मां कांचनपुरी ।
करी इच्छा तें वीजयदशमिर्चे कांचन पुरी ॥
असी नाहीं पूर्वीं, पृथुकण धनें देव पुजिला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥५॥
न देत्या भक्ताची, तुंज कधिं दया येत नव्हती ।

जशी द्राक्षालागीं, रुचिकर दुधें येत नवती ॥
तुम्ही त्या अवतारीं, खचित लव भार्जीस भजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥६॥
उपेक्षा आपेक्षा, नच अवधुता खचित रुचे
न तापे तापेही, सबळ फळ ये खचि तरुचें ॥
निरापेक्षी दाता, तुजसम गुरो कोण सजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥७॥
तुझ्या आतिथ्याला, सति अनुसुया साच निभली ।
बहु त्वांही केली, कसुनि तिजला जाचणि भली ॥
कळावें दात्याला, विबुधजन धारा समजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥८॥
प्रभो दातृत्वाची, सहज तुमच्या मानसिं कला ।
अर्धीची होती त्या,वर अनुसुयेपाशिं शिकला ॥
अम्हां वाटे चिंतामणि रविप्रकाशें उमजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥९॥
नुपेक्षीतां देसी, म्हणुनि जगतीं ‘ दत्त ’ म्हणती ।
कृपेनें तारीले, जड मुढ किती नाहिं गणती ॥
तुझ्या औदार्याचा, त्रिभुवनिं नगारा गरजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥१०॥
पित्याची पुत्रांगीं, प्रतिरुप गुणाची वसतसे ।
कुळाचाराचेहीं, कुलज करिती दीवस तसे ॥
तुम्ही अत्री ऐसे, सम सकल धर्मे परजला ।

दयाळा श्रीदत्ता जय अवधुता ! पाव मजला ॥११॥
वसूदेवें चोरी, करूनि हरि नेला पर-गृहीं ।
हरीला चोरीची, म्हणुनि चट लागे समग्र ही ॥
लपे कुब्जाखोपीं, त्यजुन घरचा उंच मजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥१२॥
करी चोरी मारी, नट नर भटालाच ठकवी ।
सुभद्रा झाला त्या, हंसुनि गुण गाती चट कवी ॥
शिशूपाळाच्या तो, कुटिल वचनें फार खिजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥१३॥
विधीला व्यालासी, नकळे नर नारी नपुंसक ।
पुराणीं व्यासाचीं, ठळक वचनें तीं न पुसक ॥
तुला बा ! जाणाया, दशशत फणी वेद थिजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥१४॥
अह्मां विश्वात्म्या तूं, दुर धरुं नको पावाची तरी ।
दुजा एक्या भिंतीवरि दिसुं नये भाव चितरीं ॥
कृपा विष्णूदासावरि, करि दिनाचा गरजला ।
दयाळा श्रीदत्ता ! जय अवधुता ! पाव मजला ॥१५॥

ॐ ।　　　ॐ ॥　　　ॐ ॥।



# संकीर्ण अष्टकें.

—*ॐ*—

## १२५ अष्टक श्रीगणपतींचें (चामर)

श्रीविनायकासहीत, रंगणीं तुं शारदे।
चातकासि प्रेमवृष्टिचा जरा तुषार दे॥
या मयूर छंदिं शीघ्र, देइ मेघगर्जना।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना॥१॥
मूषकावरूनि मारि, काळ-व्याळ-मांजरा।
पार्वती ह्मणे अझूनि, रांगतो जराजरा॥
शंकरासि हांसवीसि, भांडसी षडानना।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना॥२॥
भक्त-संकटीं क्षणांत, येसि जासि लक्षदां।
स्वामिच्या अर्धीं सुरांसि, देसि लग्न-अक्षदा॥
हर्षतो गमे उमे, सहीत नंदिवाहना।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना॥३॥

---

१ एकदां पार्वतीनें षडानन व गणपतीस सांगितलें कीं, 'सर्व देवांना अक्षद देऊन जो अगोदर येईल त्याचें लग्न करूं'. असें सांगतांच षडानन हंसावर बसून झरझर जाऊं लागले. गणपतीचें स्थूल शरीर व मूषकवाहन यामुळें अगोदर येण्याचें चिन्ह दिसेना. नंतर विश्वात्म आदिनाथ शंकर यांचें पुढें अक्षद ठेविली ती सर्व जगतास पोचली असें सांगून गणपती पार्वतीजवळ आला व पार्वतीनें गणपतीचें कल्याण सम्मति दिली.

बा, तुझा कुठार धार, वीजयी विनायका ।
तोषली बहूत देवि, मूळपीठ नायका ॥
भार्गवासि दीधलीस, शत्रुकूळ नाशना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥४॥

वीजयी जरी असे, भली तुझी कुठारचीं ।
माझिं संकटें तरी, निवारि मारि ठारचीं ॥
चिंतितां सुरक्षिसी, नुपेक्षि भाविकां जना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥५॥

वीषयांकडे दशेंद्रियें बळेंचि हांकिती ।
ईकडे न येउं देति, ताप सांगु हा किती ॥
लांडगे धरोनि जेंवि, नेति वत्स कानना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥६॥

या प्रसंगिं येइ येइ, घेइ घेइ वांकडें ।
त्राहि त्राहि पाहि पाहि, माझिया जिवाकडे ॥
या प्रमत्त षड्रिपूंनिं, मांडिली विटंबना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥७॥

भो, कृपाघना ! अतां, दिनावरी कृपा करा ।
दावें पूर्ण मूखचंद्र, य चकोर पांखरा ॥
द्या सुखामृताचि धार, लेंकरासि प्राशना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥८॥

तूं उदार ज्ञानसिंधु, दीनबंधु मोरया ।
याचकाचि वंचना नका करूं समोर या ॥

राहिलों क्षुधीत दीन, मी करीत याचना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥९॥
धर्मकार्मि आड येति, विघ्नकार बंधना ।
वेष्टिती भुजंग जेंवि, कां सुगंध चंदना ॥
पातकाभ्र तीं निरभ्र, तूं करी प्रभंजना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥१०॥
सिद्ध देवता गुरूहि, ज्ञानहीन पातक्या ।
बोलती तुं दूर जाइ, जाइ आत्मघातक्या ।
तीर्थ पर्वण्या नद्याहि, गर्जती नना, नना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥११॥
आवलोकितांचि काय, मत् अगाध पाप गा ।
शंकराचिया जटेंत, गुप्त झालि आपगा ॥
बौद्ध आवतार तो, धरूनि देव बोलेना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥१२॥
चिंतितांचि देव स्तंभि कडकडोनि पावती ।
दीधली परंतु त्या, ध्रवा रडोनि पावती ॥
तारिती मला न कोणि, या पदांबुजाविना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥१३॥
उद्धरावयासि नामकीर्तनीं अभंग गा ।
शुद्ध भाक्तिनें प्रसन्न, होय पांडुरंग गा ॥
भक्ति प्राप्ति व्हावयासि ज्ञान कोणि देइना ।

श्रीगणाधिशा नमो नमोस्तुते गजानना ॥१४॥
देशि भुक्ति मुक्ति भक्ति बुद्धि ज्ञान चांगलें ।
बा! मला म्हणूनियां तुझेंचि ध्यान लागलें ॥
तूं गुणांबुधी तुझ्या,समान देव अन्य ना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥१५॥
धर्म अर्थ काम मोक्ष, पूरुषार्थ चारची ।
देतसा मलाहि द्याचि, चालवा प्रचारची ॥
जोडितों नमूनि दोन्हि, हात कीर्तिवर्धना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥१६॥
अंकुशें वळूनि चित्त, लावि आपुल्या पदा ।
फरशुनें समूळ विघ्न, तोडि मागल्या पदा ॥
दे पहावया स्वरूप, दिव्यज्ञान-अंजना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥१७॥
दूरवांकुराचि हीरवी जुडी शिरावर ।
हीरवीच शालजोडि, हीरवा पितांबर ॥
हीरवीच कंठि पाचुची प्रकाशि भूवना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥१८॥
अंगिं चर्चिली उटी, सुगंध गंध केशरी ।
वाढि ताटिं पक्व अन्न, अन्नपूरणेश्वरी ॥
सार प्रार्थना हि स्वस्थ, चित्त सारिं भोजना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥१९॥
देसि प्रेम-रंग चित्तिं, भक्त-काम-सारथी ।

सत्य प्रेमरंगिं नित्य, मी करीन आरती ॥
लक्ष वाति लाउनी, निरंजनीं निरंजना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥२०॥
ही जधीं अखंड ध्यानिं, राहतील पावलें ।
मी तधीं म्हणेन आत्म,-साक्ष मोक्ष पावले ॥
बा ! कृपा करूनि पूर्ण, पुरवि माझि वासना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥२१॥
ऐक येक ही विनंति, पूर्ण ज्ञानसागरा ।
घ्या पदाक्षराचि माळ, जाइ जूइ मोगरा ॥
विष्णुदास म्हणे नुपेक्षि, रक्षि विघ्न-भंजना ।
श्रीगणाधिशा नमो, नमोस्तुते गजानना ॥२२॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

## १२६ अष्टक श्रीउनकेश्वराचें ( वसंततिलका )

श्रीपार्वती-शिव-कुमार-गजाननाला ।
आमंत्रितों मि अभिवंदुनि भोजनाला ॥
प्रेमें वसंततिलकामृत पाक सेवा ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शंभुदेवा ॥१॥
तीर्थें व्रतें जप तपें, नव साधनानें ।
जें वेदशास्त्र-पठणें, नवसा धनानें ।
तें जाहलें सहज दर्शन आजि देवा ।
भो, त्राहि त्राहि उमकेश्वर शंभुदेवा ॥२॥
अध्यात्म ज्ञान भजनीं, मन शुद्ध नाहीं ।

नाहींच केलि त्रिपदा, जप साधनाही ॥
संध्या न तर्पण पुजा, गुरु-देव-सेवा ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शंभुदेवा ॥३॥
संसार सार गमलें, धन-पुत्र-दारा ।
आयुष्य हें खरचिलें, मलमूत्र-दारा ॥
हातो हतीं गमविला, नरदेह-ठेवा ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शंभुदेवा ॥४॥
हे कामक्रोध खळ निष्ठुर गांजिताती ।
चिंता अशा कलपना, तनु भाजिताती ॥
कापील मान रिपु हा, न कळेचि केव्हां ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शंभुदेवा ॥५॥
भोगीत दुर्धर सदा अपदा श्रमासी ।
आलों बहू श्रमुनिया, भवदाश्रमासी ॥
तोडी समूळ तरु हा, संवसार देवा ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शंभुदेवा ॥६॥
अर्धांगि पार्वति अणी, तुलि अर्ध अंगीं
मातापिता उभयतां, तरि एक जागीं ॥
द्यावा मला अपुलिया, चरणीं विसावा ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शंभुदेवा ॥७॥
श्रीशंकरा जनक तूं, जननी भवानी ।
हे नाथ नाथ करुणार्णव मोक्षदानी ॥
आलों तुला शरण मी, अजि देवदेवा ।

भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शुंभुदेवा ॥८॥
काया मळी मळविली, जरि लेंकरानें ।
प्रक्षाळुनी जननिनें, अपुले करानें ॥
देणें तया अळवुनी निजप्रेम मेवा ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शुंभदेवा ॥९॥
आतां प्रसन्न मजला, परमेश्वरा हो ।
आलक्ष ध्यान हृदयांत, सदैव राहो ॥
देवोनिया अभयदान, समीप ठेवा ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शंभुदेवा ॥१०॥
श्रीक्षेत्रभूमि उनकेश्वरिची इनामी ।
झाली म्हणे हि पुरुषोत्तमस्वामि नामीं ॥
आतां न जाउं सहसा, दुर मोक्ष-गांवा ।
भो, त्राहि त्राहि उनकेश्वर शंभुदेवा ॥११॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १२७ अष्टक श्रीकाळभैरवाचें

( वसंततिलका )

श्रीमन्महागणपते, प्रणवार्थ मूर्ते ।
श्रीशारदे सुरवरे, निगमाख्य कीर्ते ॥
श्रीसद्गुरू जनक तूं, जननी शिराणी ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥१॥
संसार दुःख शरपंजर भंगताहो ।
संरक्षिता तुम्हि स्वयें, शरणागताहो ॥

ऐसी वदे निगम साक्षर सिद्धवाणी ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥२॥
साक्षात मोक्षपुरिचे, तुह्मि कोतवाल ।
हें मोड खोड जर लांकुड कातवाल ॥
होईल त्याचि पुतळी, रुपवंत राणी ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥३॥
जे जे तुझ्या नर अधीं स्मरती पदातें ।
ते ते न पावति कधींच दुरापदातें ॥
यासाठिं मीं विनवितों दिन दीनवाणी ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥४॥
आह्मों अह्मी उभयतां, जरि काशिवासी ।
नाहीं तरी अझुनि भेटि जिवा शिवासीं ॥
ती केलिया अनुदिनीं, बहु गाउं गाणीं ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥५॥
भागीरथीस यमुनेस सरस्वतीला ।
उद्धार भार अमुचा, सर्वस्व तीला ॥
तूं पोंचवीसि जरि नेउन त्या ठिकाणीं ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥६॥
श्रीकाशिवासि करुणाकर लोकपाळा ।
माझ्याहि लावि विभुती अपुली कपाळा ॥
मिरवीन मी त्रिभुवनांत, तुझी निशाणी ।

श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥७॥
श्रीक्षेत्रकाशि विश्वश्वर अन्नपूर्णा ।
भागीरथी तिहि नसे, स्वगुणें अपूर्णा ॥
त्याठायिं मीं असुं नये, दुर्दैन्यवाणी ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥८॥
अध्यात्मवंत ह्मणती, सदय प्रकाशी ।
ती दावि या हृदयमंदिरिं क्षिप्र काशी ॥
मोक्षाचि ती प्रगटवीं, उघडी निशाणी ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥९॥
रुद्राक्ष चंदन त्रिपुंड्र सुपुष्पमाळा ।
कंठा त्रिशूळ डमरू, मणि भस्म व्याळा ॥
वेष्टीत मस्तकिं जटा, वर दत्तपाणी ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥१०॥
असतांहि अंगिं सर्वोपरि स्वाधिकार ।
ज्ञानी पुरूष न कधीं, करिती धिकार ॥
नोपेक्षिती न करतीं, स्व यशासि हानी ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥११॥
माझी अतां शिवसुता, न करी उपेक्षा ।
दे आत्मज्ञान यवढी, नुरवी अपेक्षा ॥
भो ! विष्णुदास करिं सावध तूं निदानीं ।
श्रीकाळभैरव प्रभो, जय दंडपाणी ॥१२॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

**१२८ अष्टक श्रीपरमेश्वराचें** ( शा. वि. )

श्रीचिंतामणि श्रीसरस्वति गुरू, दत्तात्रयाच्या पदा ।
वारायास्तव वंदितों सकळही, तापत्रयांच्या ऽपदा ॥
पाजावें मजला कृपामृत शशी, पाजी जसें पंखरा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥१॥
भक्तांची बहु तांतडी घडिघडीं, वारावया संकटें ।
वाटे येउनि राहिला प्रभु तुम्ही, येथें उभे एकटे ॥
कोठें श्रीगिरिजा क्षिराब्धितनया, आहे शशी-शेखरा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥२॥
नाना रत्नखचीत कुंडल जटे-चा मस्तकीं टोपची ।
झाल्या कांहिं प्रसन्नता मग नसे, देण्यासि आटोपची ॥
आनंदें दुबळेहि वांटिति पहा, देवालयीं शर्करा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥३॥
माळा लिंग त्रिशूळ पन्नग करीं, तीपुंड्र पीतांबर ।
अंगीं केशरमिश्र चर्चित उटी, सूगंध तैलांबर ॥
पुष्पांचे-हर-भार डोलत गळां, जाई जुई मोगरा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥४॥
मच्छादी अवतार मुख्य गणिले, व्यासें पुराणीं दहा ।
झाला शांत परंतु रामभजनें, प्याल्या विषाचा दहा ॥
जागूनी परदुःखची अनुभवें, केले पुरे आकरा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥५॥
माझी कां करुणा नयेचि तुमच्या, अद्यापि चित्तांतरीं ।

आहों मी अपराधि फार ह्मणुनी, सांगूं कितीदां तरीं ॥
सांगात्रें तरि पावना ! पतित हा, खोटा असे की खरा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥६॥
कीर्ती वाढविणें म्हणूनि अणितां, धाडोनि बोलावणें ।
ते हें वाढवणें यथार्थ अपुल्या, यादीस या लावणें ॥
मागें धाडुं नये प्रसाद दिधल्या, वाचूनि या किंकरा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥७॥
माराया उचलूं नकाचि सहसा, ताराव्याचा कर ।
राहूंद्या गृहिं हा नसे उचित उद्धारावया चाकर ॥
ना लावा परक्या गृहीं मग तुम्ही, वाटेल तैसें करा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥८॥
आसोनी हृदयस्थ मूर्ति न दिसे, माझी मला कां तरी ।
विष्णूदास ह्मणे अलेत पडदे, डोळ्यांवरी कां ? तरी ॥
या अज्ञान-तमा हरूनि उदया, येई त्वरें भास्करा ।
हे शंभो परमेश्वरा हरिहरा, विश्वंभरा शंकरा ॥९॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १२९ अष्टकें श्रीसद्गुरूचीं ( वसंततिलका )

### अष्टक श्रीगोचरस्वामींचें

श्रीपूर्णब्रह्म करुणाघन सारसाक्षी ।
श्रीपूर्णब्रह्म जगजीवन सार साक्षी ॥

---

१ नांदेड जिल्ह्यांत वाढवणें या गांवीं परमेश्वराचें स्थान आहे.

श्रीपूर्णब्रह्म प्रभु गोचर विश्वस्वामी ।
श्रीसद्‌गुरूवर-पदं सततं नमामी ॥१॥
संसार रानिं भ्रमलों, श्रमलों उगामी ।
नाना कपाटि बसलों, फसलों उगा मी ॥
कामादि दुष्ट रिपुच्या, पडलों लगामीं ।
श्रीसद्‌गुरूवर-पदं सततं नमामी ॥२॥
नाहीं सुमार्ग जगतांतरिं उद्धराया ।
नाहीं अधार असरा दुसरा तराया ॥
माता पिता न प्रपिता सुत मित्र धामीं ।
श्रीसद्‌गुरूवर-पदं सततं नमामी ॥३॥
कोणापुढें मि पसरूं, मुख दीनवाणी ।
कोणी हतीं न धरिती, मज नीरवाणी ॥
अज्ञान दीन दुबळा, अगळा अहों मीं ।
श्रीसद्‌गुरूवर-पदं सततं नमामी ॥४॥
भूदेवता भजन पूजन स्नानसंध्या ।
नानाकथा जपतपादिक कर्मचिंध्या ॥
सोडोनि दानव्रत आगम नीगमा मीं ।
श्रीसद्‌गुरूवर-पदं सततं नमामी ॥५॥
तैलंग देश करनाटक अंगवंग ।
श्रीविष्णुमूर्ति भुवनें, शिव ज्योतिर्लिंग ॥
काशी प्रयाग सरिता-तट पुण्यभूमी ।
श्रीसद्‌गुरूवर-पदं सततं नमामी ॥६॥

ज्ञानेश्वरी विशद भाग्वत पाठ गीता ।
आभंग श्लोक पद टाळ मृदंग गीता ॥
श्रीयंत्र मंत्र धड येकहि जाणिना मीं ।
श्रीसद्‌गुरूवर-पदं सततं नमामी ॥७॥
प्रेमें वसंततिलकामृत पुष्पमाला ।
केली समर्पण गुरू पुजकोत्तमाला ॥
देईल नित्य नवरंग सुगंधनामी ।
श्रीसद्‌गुरुवर-पदं सततं नमामी ॥८॥
अष्टांग योग करणें फिरणें कशाला ।
पाताळ स्वर्ग भुवनादि अनेक शाळा ॥
झालों सलग्न पुरुषोत्तमरूप नामीं ।
श्रीसद्‌गुरुवर-पदं सततं नमामी ॥९॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

**१३० अष्टक श्रीचिन्मयानंदाचें** ( व. ति. ) वृत्त-भुजंगप्रयात

नमो मोरया शारदा मोरयानी ।
गुरू सच्चिदानंद कैवल्यदानी ॥
गुरू शंकराचार्य आचार्यमाळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥१॥
दयासागरा भाग्यवंता उदारा ।
अलों आपुली कीर्ति ऐकूनि दारा ॥
अजी लाभली ही भली पुण्यवेळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥२॥
तुंची शत्रुचा शत्रु आजानबाहू ।

तुझ्यावीण मातृ-पितृ-आजा न बाहू ॥
तुंची या जगाच्या जिवाचा जिव्हाळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥३॥
रजाच्याश्रयें शत्रु साही तमातें ।
गमे प्रेरितां हीत आहीत मातें ॥
म्हणूनी अली भोगणें बंदिशाळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥४॥
अभीमान माझा मला काळ झाला ।
अही पाळिला झोंबला काळजाला ॥
अतां सोडवी शीघ्र वैद्या नकूळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामीं दयाळा ॥५॥
जरीं मी अहों सर्वथा पापराशी ।
तरी आत्मज्ञानानळें कापराशी ॥
स्वयें स्पर्शिलया उद्भवे दिव्य ज्वाळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामीं दयाळा ॥६॥
जरा व्याधिची लागलीसे उपाधी ।
कशाचीं सुषुप्ती सुखाचीं समाधी ॥
म्हणूनी अली भोगणें बंदिशाळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥७॥
करीना जशी व्यंग गंगा तरंगा ।
तसें घ्या कुसंगा सुसंगांत रंगा ॥
आलिंगोनि लावी निजानंदिं डोळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥८॥

गुरूनाम हीं कुंडलें घोषकानीं ।
गुरूचिंतनें संसृती-दोष-कांनीं ॥
गुरू वंदनें जन्ममृत्यूसि टाळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥९॥
महोत्साव हा वद्य वैशाखमासीं ।
भरे द्वादशीचा नंद शेषाखमासीं ॥
मिळे भुक्ति मुक्ती सुखाचा सुहाळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥१०॥
कृपेची अतां तूं गुरू माउली हो ।
करी विष्णुदासावरी साउली हो ॥
धरूं ने अतां भाव पोटीं निराळा ।
गुरू चिन्मयानंद स्वामी दयाळा ॥११॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १३१ अष्टक श्रीशिवरामानंदस्वामींचें ( मालिनी )

गणपति सह भावें, वंदितों शारदा ही ।
तदुपरि गुरुदेवी, देव अवतार दाही ॥
नुतन वधु वरोही, मालिनी वीबुधातें ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी-पदातें ॥१॥
शिव शिव शिवरामा, सद्गुरु मायबापा ।
तुजविण परिहारी, कोण माझ्या त्रितापा ॥
तृण धरुनि वदान्या, पातलों दीन दातें ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी-पदातें ॥२॥

शिव शिव परि मज मीं, कोण आहों कळेना ।
क्षणभर मन माझें, सर्वथा आकळेना ॥
बहुविध दुर् बुद्धी भोगवी आपदातें ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी-पदातें ॥३॥

शिव शिव गुरुराया, तारिसी लोक सारे ।
परि जड तुजभारी, मचि झालों कसा रे ॥
त्यजि मजविषयीं कां, कामधेनू दुधातें ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी-पदातें ॥४॥

जंववरि जड आहे, भावना ही मरेना ।
तंववरि गुरुराया ! बोधमाला जिरेना ॥
अवगुणि अवपथ्यें, दोष दे ओखदातें ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी-पदातें ॥५॥

उन्मनि दृढ मुद्रा, सद्गुरूंज्ञान-बोधें ।
सतत भजन राधे, कृष्ण गोविंद राधे ॥
जप तप व्रत दानें, यज्ञ स्वाहा स्वधाते ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी-पदातें ॥६॥

शरुनदि प्रणितेच्या, साक्षपें वाळवंटीं ।
सतत गुरु-समाधी, शोभती हारकंठीं ॥
भजति परम योगी, देव कैवल्यदाते ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी पदातें ॥७॥

षडरिपु यवनांनीं, बांधिली गाय दावीं ।
झडकरि गुरुराया, सोडवी पाय दावीं ॥

अठउनी दिनरक्षी, आपुलीया ब्रिदातें ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी-पदातें ॥८॥
जनन स्वरुप विष्णूदास दास्यत्व गेलें ।
तुह्मि मज गुरुनाथा, सर्वथा स्वाभि केलें ॥
मिन मज मिळवीलें, अमृताच्या ऱ्हदातें ।
भजगुरु शिवरामानंद-स्वामी-पदातें ॥९॥
ॐ । ॐ ॥ ॐ ॥।

## जन्म व पाळणें

—* ॐ *—

### १३२ श्रीदत्त जन्म

( अंजनीगीत )

श्रीगुरु नारायण जयहरी । वाचा गर्जे नामोच्चारीं ।
ब्रह्मपरायण ब्रह्मचारी । जो ब्रह्मपुत्र ॥१॥
ब्रह्मानंदीं अंतकरण । ब्रह्म सनातन जो परिपूर्ण ।
करींत ब्रह्मभुवनीं भ्रमण । कैलासा गेला ॥२॥
पार्वति ह्मणे कमलोद्भव सूता । सत्वधीर गुणकुलशिल ।
वनिता । कोण असे जगीं पतिव्रता । मजप्रति सांगावें ॥३॥
नारद ह्मणे निःसंशय वाणी । पतिव्रता सद्गुणखाणी ।
मज, अनसूयेसमान कोणी । न दिसे ब्रह्मांडीं ॥४॥
पवित्र अत्रिऋषिची जाया । पवित्र जियेचें चरित्र गाया ।
सकळ देव तीर्थें पाया । वंदन करिती ॥५॥

तिजसम ब्रह्मांडीं आढळेना । तिळभर निजसत्वासि ढळेना ।
तुह्मासि तुळणा तिची तुळेना । पद अंगुष्ठाची ॥६॥
लक्ष्मी पार्वती सावित्रीला । यापरि सांगुनि नारद गेला ।
निज अपमानें तिघींसी चढला । चिंताज्वर भारी ॥७॥
तिघांसि म्हणती तिघी वनिता । देवपणाची कैंची सत्ता ।
आम्हांपेक्षां अली आधिकता । त्याविप्रस्त्रीसी ॥८॥
यामधें नाहीं तिळ अनुमान । दुःखचि वाटे मरणसमान ।
म्हणती सोसेना अपमान । क्षणभर हा आम्हां ॥९॥
यास्तव आपण सत्वर जावें । अनुसूयेचें सत्व हरावें ।
वेगें इतुकें कार्य करावें । तुम्हीं अमुच्याकारितां ॥१०॥
अनुसूयेचें सत्व न हरितां । कराल अमुची जरि नादरता ।
तरि मग प्राणत्यागापरता । संकल्प नाहीं ॥११॥
ऐकुनि निजवधुच्या अनुमत्ता । मोठे देवही भ्रमले चित्ता ।
तरि मग मानवाची वार्ता । बोलावी काय ॥१२॥
दंडकमंडलु जटाधारी । वल्कल वेष्टित निवाहारी ।
अलक पुकारित ठाकती द्वारीं । यती अनुसूयेच्या ॥१३॥
ह्मणती यतिरुप देव तिघेही । सत्वर इच्छाभोजन देई ।
परंतु होउनि नग्न देहीं । अह्मांसि वाढावें ॥१४॥
सदान्न वस्त्राविण वाढावें । तरि हें सुकृत यश जोडावें ।
अथवा सत्वाचें मोडावें । संतत व्रत अपुलें ॥१५॥
ऐकुनि यतिची अवघड वाणी । ह्मणे अनुसूया उघडवाणी ।
हे यति माझ्या बाळावाणी । होवोत तिन्ही बाळें ॥१६॥

अदि पुरुषाची ती मुळमाया । व्हा शिशु ह्मणतांची अनुसूया ।
अवलंबिति विधि हरिहर काया । शिशुची अविलंबें ॥१७॥
चतुरानन शिव शेषशायी । बाळकें कडे घेउनि लवलाही ।
पाळणीं घालुनिया गीत गाई । हर्षें अनुसूया ॥१८॥
मार्गशीर्ष ऋतु हेमंत । शुद्ध पौर्णिमा शुभवंत ।
अभिजित समयीं श्रीगुरुदत्त । अवतार झाला ॥१९॥
आनंद आनंदाचा दिवस । फळलें आनंदें जप तप नवस ।
पूर्ण आनंदाचा कळस । शिखरासी गेला ॥२०॥
पुरुषोत्तम स्वामीचा स्वामी । श्रीगुरु दत्तात्रय स्मरगामी ।
स्वयंभु अत्रीऋषीच्या धामीं । अवतीर्ण झाला ॥२१॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १३३ पाळणा श्रीदत्ताचा

जो जो जो जो रे गुणत्रया । बाळा दत्तात्रया ॥धृ०॥
चतुरानन देवा परमेष्टी । बा, तुज होईल दृष्टी ।
झालासी बाळा ! बहुकष्टी । करितां प्रतिदिनि सृष्टी ।
होउनि चंद्र दिशांबर वेष्टी । करिं अमृतरस वृष्टी ।
सुशांत उज्वल शीतळ काया ॥ बाळा० १ ॥
निजरे निजबाळा, अनंता । देवा, लक्ष्मीकांता ।
निर्गुण सगुणरूपा, स्वयंभुता । अनुसूयेच्या सुता ।
श्रमलासी पतितां, उद्धरितां । जग प्रतिपालन करितां ।
तूं प्रभु गुरुदाता, भुवनत्रया ॥ बाळा० २ ॥

अजन्म पुरुष अला, जन्मास । आनंद जीव शिवास ।
भक्तास्तत्र त्यजुनी, कैलास । गिरिनंदिनि वैलास ।
तूं महावंद्य ऋषि, दुर्वास । दिङ्मंडळीं करि वास ।
तपकरी तपोवनीं, तपालया ॥ बाळा० ३ ॥
राहे सिंहाद्री पर्वतीं । वैकुंठीची मूर्ती ।
लक्ष्मी सावित्री, पार्वती । करिती मंगळ आरती ।
सुरवर-गण पुष्पांजुळी वाहती । सन्मुनी ध्यानीं पाहती ।
नतजन तुज बाहती, गुरुराया ॥ बाळा० ४ ॥
जाहला स्वानंद, लाभ वनीं । अत्रिऋषिच्या भुवनीं ।
ह्मणती देवऋषी, शुभाननी । धन्य अनुसूया जननी ।
पुरुषोत्तमस्वामी, दिनरजनीं । डोले निरंजनीं ।
अभिवंदन करूनी, गुरुपाया ॥ बाळा दत्तात्रया० ५ ॥
ॐ । ॐ ॥ ॐ ।॥

## १३४ श्रीराम जन्म

( अंजनीगीत )

श्रीसच्चित्घन रामायण ! श्रीवाल्मिकिकृत रामायण ।
श्रीशुभ मंगल पारायण । श्रीश्रुति जन गाती ॥१॥
श्रीक्षिरसिंधूचें लावण्य । रत्न प्रकाशित गूण अगण्य ।
पुत्र तुझा तुझें अगाध पुण्य । कौसल्येबाई ! ॥२॥
कल्याणाचें हें कल्याण । विश्रांतीचें हें ठिकाण ।
पंचप्राणाचें हें प्राण । बाळ तूझें ॥३॥

याचें चरित्र शंभर कोटी । ब्रह्मांडाच्या भरलें पोटीं ।
विचित्र याची महिमा मोठी । वर्णावी कोणीं ॥४॥
समाधि लाउनि आनंदानं । याचें शंकर करितों ध्यान ।
कैवल्याचें हें निधान । जन्मासी आलें ॥५॥
खळ राक्षसकुळ संहाराया । अमरगणांचें दुःख हराया ।
धर्म प्रतिष्ठित जन ताराया । जाहला अवतार ॥६॥
भाविति भाविक जैसें जैसें । चरित्र दाखवि तैसें तैसें ।
परि मुळ याचें ऐसें ऐसें । कैसें सांगावें ॥७॥
सहस्र वदनाची मति भ्रमली । करितां स्तव वेदश्रुतिश्रमली ।
भ्रमरीपरि श्रीलक्ष्मी रमली । पदकमळीं याचे ॥८॥
पुष्य नक्षत्रीं उत्तम । अभिजिन्मुहूर्ताचा संगम ।
चैत्र शुद्ध नवमीस राम । जन्मासी आला ॥९॥
सुंदर लावण्याची खाणी । हा गुण गंभीर चापपाणी ।
नारदादिक मंगल गाणीं । गंधर्वगाती ॥१०॥
मंगळ वाजंत्री वाजती । मंगळ चौघडे गर्जती ।
सुरगण पुष्पांजुळी वर्षती । मंगळानंदें ॥११॥
ये क्षिरसिंधुचि मूर्ति उर्वी । परि भवसिंधू–बिंदु न उरवी ।
जगिं अवताराच्या या पूर्वीं । विख्याती केली ॥१२॥
क्रोधें जननीच्या कैवारें । केलें निःक्षात्रिय तळसारें ।
संहस्त्रार्जुन सहपरिवारें । वधियेला येणें ॥१३॥
प्रस्तुत स्त्रीचें निमित्त करूनि । एकपत्नीचें दृढव्रत धरूनी ।
समरीं वानर-संगति करूनि । निवटिल राक्षस हा ॥१४॥

जो भृगुकुळमाणि भार्गवराम । तो हा रघुकुळ- दीप राम ॥
दोघे एकचि रामराम । बहुनामीं रंगें ॥१५॥
श्रीरेणूका अंबाबाई । ती कौसल्या तूंचि आई ।
विष्णुदास लागे पायीं । वेळों वेळां ॥१६॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १३५ कटाव-रेणुकेचा

येग येग येग जगदंबे ॥ धृ ॥

जय जय रेणूराजकुमारे । आई रेणुके अति सकुमारे ।
जगज्जननी जय जगदोद्धारे । कृष्णामालिक ग्राम विहारे ।
त्रिपुरसुंदरे तितापहारे । अमृतकरवर अजर-आमरे ।
आनंदघन कैवल्य मंदिरे । ठाकिति सनकादिक सामोरे ।
वंदिति पदमुनि-जन संभारे । सुरगण वारिति शिरीं चामरें ।
राबति ऋद्धि सिद्धि आदरें । तुझीं विचित्राचि गूण चरित्रें ।
त्रिभुवन पावन परम पवित्रें । नाचविसी जगताचीं चित्रें ।
करीं अविलंबुनि आपल्या सूत्रें । स्वयें स्वतंत्रें इच्छामात्रें ।
कोमलगात्रे ! पंकजनेत्रे ! सकळारंभे । अनुपमरूप स्वयंभे ॥
येग येग येग जगदंबे ॥ १ ॥

मुळपिठ मृगराजाचल शिखरीं । सदा विराजे त्रिभुवन मुखरीं ।
ब्रह्मी माहेश्वरीशंकरी । श्रीनारायणी सदयाभ्यंकरी ।
दशशात फणिच्या द्विगुणवैखरी । सत्कीर्तीच्या वाचिति वखरी ।
तुझीं चराचरीं सत्ता अखरीं । क्रीडति एके स्थळीं वृक बकरी ।

करी दुराशा डुरडुर डुकरी । विकल्पनेच्या पडुन लष्करीं ।
बहुत जाहली जगीं मस्करी । नको नको ही फजिति बसूकरी ।
जगदंबे! करुणाकर लवकरी । असुर विटंबे ।
अनुपम रूप स्वयंभे ॥ येग येग येग जगदंबे ॥२॥

ब्रम्हानंदे चित्सुखसदने, प्रसन्न हो, मज प्रसन्न वदने ।
प्रसाद फळ दे, राजनंदने । कल्पलतिके कल्याण वर्धने ।
दुर्जय महिषासूरमर्दने । खळ मधु-कैटभ घोरकंदने ।
तुज चिंतावें स्वयें मधुसुदनें । तव पदपंकज-रेणु वंदनें ।
तुटती भवसंसार-बंधनें । लाभे सुकृत सकलाराधनें ।
योगी भ्रमती वायुरोधनें । याज्ञिक जाळिति आज्य इंधनें ।
काय करावें अह्मीं निर्धनें । करुनि ध्रुवाच्या परी रूदनें ।
प्रार्थितसे तृण धरून रदनें । सदानंदकर आनंद निधने ।
आई रेणुके, हे शुभवदने । विजय कदंबे । पाव मला
अविलंबे ॥ येग येग येग जगदंबे ॥३॥

तूं आदिमाये प्रणवरूपिणी । सकळगूणसंपन्न शिरोमणी ।
श्रीजमदग्नीची मनरमणी । सुरवर वर्णिति कुमार चिमणी ।
भक्तजनांची कुलस्वामिणी । अनंत ब्रह्मांडांची राणी ।
सुंदर लावण्याची खाणी । अखंड सौभाग्याचि शिराणी ।
वैदिक पंडित शास्त्रि पुराणी । करिती कीर्तन गाती गाणी ।
रणीं जिंकिला सहस्रपाणी । केलि सर्व निःक्षत्रिय धरणी ।
तूं तेजोमय प्रतापतरणी । प्रगटलीस भवसागर तरणी ।

शरणागत-जन-संकट-हरणी । येसी धांवुनि नामस्मरणीं ।
विष्णुदास शिर ठेऊनि चरणीं । ह्मणे भेटिची लागली झुरणी ।
कधिं वरवाणी ऐकेन कर्णीं । ध्यान धरिन तव अंतःकरणीं।
अर्पिन अंबे । उतरीन सैंधव लिंबें ॥ येग येग येग जगदंबे ॥४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १३६ कटाव वनाचा

अंब लिंब वट पोफळि जांभळी । रातांजन अंजीर कर्दळी ।
तुतें नारिंगें पेरु पोफळी । चुंबित नक्षत्रांगण नारळी ।
बदाम खर्जुर राय आवळी ! निष्कंटक शमी देव बाभळी ।
ताडवृक्ष फणसाच्या पाळीं । फळें लोंबती डाहाळो डाहाळीं ।
निबर पिकलीं कितिक कोंवळीं । मोह करवंदी बिल्व बकुळी ।
स्थळोस्थळीं द्रुमलता शोभती । सरोवरांचे पाट वाहती ।
जिकडे तिकडे भ्रमर धांवती । नव्या फुलांचा गंध सेविती ।
अनेक पुष्पांच्या वनजाती । जाइ जुई चंपक मालती ।
गुलाब गुलछबु टोप शेवती । परिमळ दवणा पाच केतकी ।
रक्तवर्ण पित शुभ्र कन्हेरी । धत्तुर फुलांचे कोंब दुहेरी ।
तऱ्हेतऱ्हेचे बहुत मोगरे । तळीं पसरले ज्यांचे पसारे ।
त्यावर सुटतां मंजुळ वारें । सुगंध सेविती जन परभारें ।
चित्र विचित्र रंगीत पाखरें । वनीं क्रीडती सहपरिवारें ।
राजहंस द्विज मयूर रावे । चक्रवाक निळचाषहि हिरवे ।
कपोत भारद्वाज पारवे । बहिरससाणे टिवटिव पिंगळे ।
कृष्ण कोकिला चिमणे पिवळे । यापरि गौरीसह शिवशंकर ।

दानव अंतक रूप भयंकर । विष्णूदासावर करुणाकर ।
पाहे निज रम्य वनाला । कौतुक दे भक्तजनांला ॥ १ ॥
ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १३७ श्लोक वसंततिलका

श्रीपुण्य क्षेत्रस्थळ माहुर येकवीरे ।
तीर्थोदकीं दुरित पंक अनेकवीरे ।
श्रीरेणुके ! विमल दावि, पदारविंदें ।
नारायणी जय जगज्जननी अनंदे ॥ १ ॥
आमंत्रितों तुज मि कुंकुम अक्षतांनीं ।
ये माझिया ह्रदय-मंदिरिं-मोक्षदानी ।
माते तुझे विभव मंडप शोभिवंत ।
देतात मान गरिबांप्रति-भाग्यवंत ॥ २ ॥
श्रीमूळपीठ वसिनी जयश्री भवानी ।
वर्णावि काय महिमा हिन-मानवांनीं ।
आरंभिल्या प्रथम भाषण बालकानं ।
दे माउली मुदित वारुनि बाल कान ॥ ३ ॥
माझीहि माय जाशि तूं अवघ्या दिनांची ।
+लाऊनि घेशि उगि-कां उपव्याधि ' नो 'ची ॥
देती सहस्रवदनादिक वेद ग्वाही ।
देणार नाहिं स्वपुता-जननी दगा ही ॥ ४ ॥

---

+ ( नाहीं तुझ्यागृहीं संग्रही या दीनाची ) पाठभेद
+ नाहींच संग्रहिं तुझ्या गृहिं यादि 'ना' चीं

---

१ नाहीं नाहीं म्हणण्याची व्याधी. २ स्वतःच्या मुलांस.

अंबे तुलाचि म्हणतात, दिनाचि आई ।
सांभाळ वेद श्रुतिच्या वचनासि बाई ! ॥
नाहीं मि दीन जननी अशि मात्रवाणी ।
काढूनिया करुं नको करुणेसि वाणी ॥ ५ ॥

जीवाचि जीवनकळा अइ रेणुका, तूं ।
कापट्य कापुस नको अणुरेणु कातूं ॥
निंदेसि[२] पात्र करिसी मुळ कां कवीला ।
मुंगे टपून असती गुळ-काकवीला ॥ ६ ॥

आनंत नामिं गुणिले, गुण गूणकांनीं[+] ।
मींही म्हणून करितों गुणगूण कानीं ॥
झेंपे गरूड गगनीं निज आवसावें ।
आम्हीं स्वपक्ष असतां उगि कां बसावें ॥ ७ ॥

मोठ्यावरीच बहुधा अइनें रुसावें ।
अंकीं लहान मुल घेउनिया बसावें ॥
मोठें पहात बसतें दुर यद्यपी तें ।
मांडीवरीच लघु बालक दुग्ध पीतें ॥ ८ ॥

---

+ अशी तूं ऐस + कवींनीं

१ कमताई २ तूं कृपाळू पणानें वागावेंस. निष्ठुरपणानें वागशील तर आमचेकडून तुझी निंदा होईल. निंदा किंवा स्तवन करणें हें आमचें काम आहे. मुंगळे गुळास जसे टपून बसतात तसे आम्ही असतों याकरितां आमचे मुखांतून निंदाक्षरें निघूंच नयेत.

ते पोहणार बुडती थकतां उडाणीं ।
नौकेमधींच बसुनी तरती अडाणी ॥
ज्ञानाभिमान धरुनीं फसतो शहाणा ।
अंबे तुझ्या सतत मीं वहातों वहाणा ॥ ९ ॥

आसून ज्ञान खळग्यामधिं कां पडावें ।
मूर्खेंहि ग्रंथ इतुके तरि कां पढावे ॥
मौनेंचि मीन गिळितो बगळा झऱ्यांत ।
बोलोनि गोड पडतो शुक पिंजऱ्यांत ॥ १० ॥

देणें रुकाराचि पडे शरणांगतीला ।
ठेवी स्वदास दगडापरि संगतीला ॥
लावून पायरीं करी चउकोनि टाकी ।
खाऊनि तांबुल, वरीच थुकोनि टाकी ॥ ११ ॥

हेवा नसे तिळभरीं ध्रुव चांदणींचा ।
श्रीरणुके ! तरिं करी तरु अंगणींचा ॥
राहूं उभोचि न हसूंहि कुठें न हालूं ।
डोलूं सदोदित परीं तुजसी न बोलूं ॥ १२ ॥

किंवा सदैव आपुल्या बसवी समोर ।
माते, करून मजला शुक-हंस-मोर ॥

किंवा पशूपरि तरी गृहिं माय पोसें[1] ।
देहांतरीं सहज होइल पायपोस ॥१३॥
नाहीं अशी बरि सदा किरकीर कानीं ।
ऐकूं नयेचि करुणा किरकीर कानीं ॥
श्रीमंतिणीस धरिली अळ लेकरांनीं ।
दे माउली उचित जें घडलें करांनीं ॥१४॥

देतान्नदान श्रमलीस विशाळपाणी ।
सोडूनि सत्रिं बसलीस खुशालवाणी ॥
हाका अशा मि जगतांमधिं मारुं कां न ।
डाका[2]चि लक्षुमिगृहीं पडला रुको[3]न ॥१५॥

पाळूनि आधिं सदनांतरिं पांखराला ।
नेऊनि माय ढकलूं नये आखरा[4]ला ॥
जाता न घेतिल अतां अपणांत ऽ जाती ।
आधेमधेंचि तनुही कुपणां[5]त जाती ॥१६॥

कीं द्यावयासि बळि आणुनि बोकडाला ।
या ठेविलेसि दृढ बांधुनि लांकडा[6]ला ॥
अंबे अनाथ वृक व्याघ्र बळी न हो मीं[7] ।
तत्रापि ब्रह्मबिज हें तुं बळी न होमीं[8] ॥१७॥

---

१ पोषणकर. २ दरोडा. ३ पै. ४ गांवाबाहेर, अरण्यांत. ऽजातिविशेष. ५ मसणांत, ६ यूपस्तंभ. ७ मी दीन आहे. ८ होमांत भस्म करूं नको.

बाई तुला कशि न ये किंव माणसाची ।
जातांति प्राण निघुनी तुझि आण साची ॥
मी दीनवाणि रडतां तुज सौख्य वाटे ।
मारूं नकोचि दुखतील तुझे खवाटे[1] ॥१८॥

कां हो तुझें प्रगट नाम नये गुणाला ।
याची असे निपट लाजतरी कुणाला ॥
त्वां सोडिल्या सुपथ हा जननीपणाचा ।
श्री रेणुके ! खचितची मग मी कुणाचा ॥१९॥

नामामृतासि दुसरें रस साधनांचें ।
कां इच्छितेस "गण" हे नवसा धनाचे ॥
त्वां सोडिल्या सुपथ हा जननी पणाचा ।
श्रीरेणुके ! खचितची मग मी कुणाचा ॥२०॥

तूं शाहणी चतुर लक्षणि सद्‍गुणाची ।
जाणोनि सर्व अमुच्या मनिंच्या खुणाची ॥
त्वां सोडिल्या सुपथ हा जननींपणाचा ।
श्रीरेणुके ! खचितची० ॥ २१ ॥

माते स्वगर्भि नव्हतां नवमास लोहो ।
त्वां दाविला स्तनरसें नव मासला हो ॥
लागून गोलि सुरुची अधरास आई ।
आतां तुझ्या धरिन कीं पदरास बाई ॥२२॥

---

१ हाडे. २ ध्यास.

अंबे तुझे गुण कथामृत मी पितोची ।
क्षोभे परंतु उर हा क्षय चेंपितोची ॥
होते अतीशय मला यमयातना ही ।
आशा तुझी ह्मणुन कीं, जिव जात नाहीं ॥२३॥

हे काम क्रोध मदमत्सर लांडगे हो ।
निष्ठूर फोडिति हडें खळ दांडगे हो ॥
होते अतीशय मला यमयातना ही ।
आशा तुझी ह्मणुन कीं, जिव जात नाहीं ॥२४॥

वीकल्पनाहि फिरवी जिव गर्गराची ।
दुर्वासनाहि तनु चावित कर्कराची ॥
होते अतीशय मला यमयातना ही ।
आशा तुझी ह्मणुन कीं, जिव जात नाहीं ॥२५॥

आली जरा झरझरा हलवीत मुंडी ।
घालील ही अवदसा मृति-होमकुंडीं ॥
होते अतीशय मला यमयातना ही ।
आशा तुझी ह्मणुन कीं, जिव जात नाहीं ॥२६॥

हे काळदूत कसतीच कसूनि पाशीं ।
ते जेवला न ह्मणती अथवा उपाशीं ॥
होते अतीशय मला यमयातना ही ।
आशा तुझी ह्मणुन कीं, जिव जात नाहीं ॥२७॥

माते तुझ्याविण कसा मि जिवंत राहूं ।
आहे जिवंतचि परी अजिवंत राहू ॥

भगवत्कथामृत विषापरि गूण दावी ।
वीचित्र दैवगतिही किति हो वदावी ॥२८॥
ऐसाचि दुःसह सदा दुर वास राहो ।
त्वां सांडिलें ह्मणुनिया दुर वासरा हो ॥
सोडोनि लोभ पडली आइ ज्यास दावीं ।
त्याची जगीं दुरदशा कितिहो वदावी ॥२९॥
तो सार्वभौम नृपश्रेष्ठचि पुंडलीक ।
आसोत अन्य असतीलचि मांडलिक ॥
मातेसि पाठ[1] हरिलाहि न मूखदावी ।
मातोचि त्यासि ममता कितीहो वदावी ॥३०॥
शापेंचि पतलि दया संतिची[2] पतीला[3] ।
संताप शांतक दिला उपशाप तीला ॥
झाली शिळा मुखकळा परिहास्य[4] दावी ।
श्री राघवीं प्रिति तिची कितिहो वदावी ॥३१॥
पार्थासि कामिनि-निशा उठली कुभद्रा ।
तो कामतात बदली बनली सुभद्रा ॥
मुद्रा हिरोनि मग त्या सखयासि दावी ।
भक्ताचि प्रीति हरिला किति हो वदावी ॥३२॥

---

१ पुंडलीक मातृ सेवेंत निमग्न असतां त्यास वर देण्यासाठीं प्रत्यक्ष श्रीविष्णु त्याचे संनिध आले, परंतु त्यानें मातेकडे पाठ फिरवुन विष्णूकडे मुख केलें नाहीं एवढी त्याची मातृभक्ति थोर होती. २ अहल्येची. ३ गौतमाला. ४ रामदर्शन होईल या उःशापामुळें तिला आनंद झाला त्याचें व्यक्त रूप तिचें शिलावस्थेंतहीं हास्य मुख होतें.

अंकीं शिरें [1]स्वैरिपुनीं जरि स्थापियेलीं ।
त्यानें धरोनि कशी चर्चर कापियेलीं ॥
सद्धर्मताचि मधुकैटभिं थोरदावी ।
निष्ठूरता हरिचि ही कितिहो वदावी ॥३३॥

ये[2]कानें माय वधिली निजशस्त्रहातें ।
बाँ[3] दूस[4]ऱ्यानें वधिलाचि अशास्त्रघातें ॥
मातापित्यासि तिस[5]रा प्रतिबंध दावी ।
त्रैमूर्तिचीहि महिमा कितिहो वदावी ॥३४॥

जी ऊठवी वि[6]रथ बालक थापटोनी ।
तोडी रथीं त्रिकुट तालकथा पटोनी ॥
जी विश्वरूप पट त्या रण रंगिं दावी ।
भगवद्गीतेचि महिमा कितिहो वदावी ॥३५॥

टाकूनि कल्पलतिका गृहिं शिंदळीच्या ।
कांरे वनांत फिरतोसि तुं शिंदळीच्या ॥
कांरे, असा तरि मना पडलासि दावीं ।
मूर्खा तुझी मुढदशा कितिहो वदावी ॥३६॥

---

१ मधु कैटभ दैत्यांनीं विष्णूच्या मांडीवर मस्तकें ठेविलीं व विष्णूनें तीं कापलीं. (शत्रू होते तथापि मांडीवर मान ठेवलेल्यांची मस्तकें कापणें हा निष्ठुरपणाच आहे.) २ परशुरामानें. ३ बाण ४ श्रीरामानें. ५ श्रीकृष्ण. ६ मोहग्रस्त होऊन रथाखालीं उतरलेल्या अर्जुनास उत्तम बोध सांगितला व विश्वरूप दाखवून त्यांस शोक-मोहापासून मुक्त केलें. त्या गीतेची महिमा किती वर्णन करावी.

पीतांबरी तटाणि येत जटांबरीच्या ।
श्रीमंत दोघि बहिणीच बरोबरीच्या ॥
सिंहस्थ पर्वणिच भेटिस यावयासी ।
जाती स्मरून जन पावन व्हावयासी ॥३७॥
भगवद्गिता हि हृदयांतरिं सांठवावी ।
भगवद्गितोचि जननी मनिं आठवावी ॥
पार्थासि कृष्ण गुढ हा जयलाभ दावी ।
भगवद्गितेची महिमा किति हो वदावी ॥ ३८ ॥
अंबे तुझोंचि स्वपुतें शिर कापलेलें ।
किंचीत मात्र न दिसोचि संतापलेलें ॥
जे कां अनंदमय, वैभव भाव दावी ।
पुत्रावरी तुझि प्रिती कितिहो वदावी ॥३९॥
टाकूनियां तुं हृदयस्थित माउलीला ।
कां पाहतोसि जगतांतिल भाउलीला ॥
कारे असातरि मना पडलासि दावीं ।
मूर्खा तुझी मुढदशा कितिहो वदावी ॥४०॥
श्रीरेणुका नमन गायन स्नान संध्या ।
म्यां सोडिल्या जपतपादिक कर्मचिंध्या ॥
म्यां कांस खास धरिली स्वपितांबराची ।
श्रीनारदा परिस मी रडका बराची ॥४१॥

---

१ गीता श्रवणानंतर कृष्णांनीं अर्जुनास विजय प्राप्ती करितां जगदंबेची स्तुति करण्यास सांगितली. तेव्हां अंबे तूंच जगज्जननी आहेस. तुझा महिमा वर्णन करणें अशक्य आहे.

तूं येक काम करितां करिसी अनंत ।
तूं दोन काम करितां करिसीं अनर्थ ॥
तूं येक नाम जप टाकुनि सर्व धर्म[1] ।
तारील नामचि तुला श्रुतिसारवर्म ॥४२॥

कां धांवतोसि तुं तिच्या उगि पाठिंमागें ।
ये आपुल्याचि सदनीं फिर पाठिमागें ॥
नानाकृतीं न गवसे बहु चंचलाची ।
नामेंचि साउलि धरी निज अंचेळाची[2] ॥४३॥

दुःखाचि झाडि तुटतां तुटतां तुटेल ।
सौख्याचि वाडि जुटतां जुटतां जुडेल ॥
हा बोध शांत व तिचा, अवघा बराची ।
होतो परी प्रसुतिचा जिव घाबराची ॥४४॥

येथून प्रार्थुन तुला नमितों शुभांगे[3] ।
येथेंचि ये तुं अळशावरि माय गंगे ॥
तेथें न येचि तरि कां ह्मणतों असा मी ।
श्रीरेणुकेचि परस्वाधिन मी असामी ॥४५॥

---

१ सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणंव्रज " एका माते शरण ये सर्व धर्मांस टाकुनी " ह्मणजे 'मोक्षयिष्यामि मा शुच' तुला स्वानंदाची प्राप्ती होईल. हें एक कर्म असतां तूं व्यर्थ भ्रमून द्वैताचे चिंतन करतोस त्यामुळें अनर्थ होत आहेत. २ पदराचो. ३ भागीरथीस प्रार्थना

श्री विठ्ठलासि म्हणती जननी विठाई ।
कीं यावयासि करुणाघन शीघ्र ठाईं ॥
वाटेल बाइट विटेलचि चोखटाई ।
काढील माय अमुची म्हणतां खटाई ॥४६॥
पुत्रासि आणि जनकासि सदा अबोला ।
ऐशासि काय तरि ठेउनि स्नेह बोला ! ॥]
सारंगपाणि हरि, तो स्मर पंचबाणीं ।
दोघे विनाश करिताति प्रपंचबाणीं ॥४७॥
श्रीक्षीरसिंधु परि त्याहि रमा-पित्याला ।
संगोपितां कधिं नयेचि अमा पित्याला ॥
तूं माउली मुळपिंठाचि भली पिठाई ।
कां गूळ धुंडुं त्यजुनी अयती मिठाई ॥४८॥
येथेंचि माझि धनलक्षुमि मोक्ष काशी ।
कां तोडुं जोडुं अपरोक्ष परोक्ष काशी ॥
क्षेत्रज्ञ क्षेत्र क्षर अक्षर सारसाक्षी ।
श्रीरेणुका जननि सुंदर सारसाक्षी ॥४९॥
नाहीं दया अलि बया तुजसारखीला ।
येईल काय सखये दुसऱ्या सखीला ॥
द्वारीं तुझ्याचि मरणें निरधार केला ।
जाणार नाहिं तुज सोडुनि द्वारकेला ॥५०॥

धाल्या तुला निजसुता परि लोक सारे ।
शत्रूपरी मिच तरी गमलों कसारे ॥
आइ लेंकराचि ममता कशि तोडितोसी ।
पापाचि जोडि अजुनी किति जोडितोसी ॥५१॥

शत्रू मला छळिति तूं नसतीस जेव्हां ।
येतां गृहीं मग तुला दिसती न तेव्हां ॥
जातांचि तूं मग पुन्हां जुपती कबाडी ।
माझी समग्र तुजला दिसते लबाडी ॥ ५२ ॥

जाऊं नको गरुडपाक्षिणि माय कोठें ।
हे काळ-व्याळ, खळ धुंडिति कोटि कोठें[1] ॥
ठेवीत जाइ सहसा अपुल्या सवेंची ।
लागेल स्वर्ग उडणें मजहीं सवेची ॥ ५३ ॥

ज्यांहीं समर्पिली तुला गुणयुक्त कंठीं ।
देणें पडेल मजलाहि सुवर्ण कंठीं ॥
घेणें प्रशस्त न गमे अनुमानिकाला ।
त्वां भेटि अंति करणें अवघ्या निकाला ॥ ५४ ॥

देऊं नको क्षिर पुरी वट कोरडेची ।
ठेवूनि लोभकरि भाषण कोरडेंचि ॥
या पायिं बाई रड हा खुटतो रड्याचा ।
ऐकून घोष घन कंकण तोरड्याचा ॥ ५५ ॥

---

१ पक्षांचा घरें-कोटरें—कोठीं.

लावण्यश्री प्रगटली गृहिं राजसा हो ।
दे कोंदणीं जंव समग्र हिरा जसा हो ॥
जो होय इंद्र भजतां पदपंकजासी ।
तो येतसे न भजतां पद रंक जासी ॥ ५६ ॥

नेत्राश्रुचें दिनमुखें अवरोनि पाणी ।
अंबे विनंति करितों पसरूनि पाणी ॥
दे कीर्तनामृत सदा रस याचकां हो ।
माझ्याचि पात्रिं करतीस प्रपंच कांहो ॥ ५७ ॥

माझ्याहि मान्य करणें अइ गायनाला ।
गंगोदकीं मिसळल्या तरिं काय नाला ॥
कार्यांत कारण असें अवलंबनाचें ।
बिंबाचि सोय धरुनी प्रतिबिंब नाचे ॥ ५८ ॥

दैवें दिलें धरुनिया दरवेशिणीला ।
झालों अखंड अह्मि सादर वेसणीला ॥
सूत्रीं इच्या गवसलों मुढ माकडें हो ।
खांद्यावरी शिरिं बसूं अथवा कडे हो ॥५९॥

आतां न बोलुं तरि अक्षरही चकार ।
आल्या पुढेंचि भवबंधन मोचकार ॥
सूज्ञांसि गोष्टि करणें बहुशा कशाला ।
सूर्यापुढें मिरविणें शतशा मशाला ॥६०॥

तोंडींच नामरस अमृतवल्लि पोटीं ।
जीच्या फळोफळिं अनंत ब्रह्मांडकोटीं ॥
साक्षात मूळपिठ-वासिनि रेणुका ही ।
कांक्षा नकाचि नर हो मनिं आणुं कांहीं ॥६१॥
हे बोबडे परि ऊणे गमती न बोल ।
आईच दाटुनि ह्मणे गमती न बोल ॥
कौतूक मानि मुखिं लाउनि अंगुलींला ।
जी वर्णवीच अरुणापरि पंगुलीला ॥६२॥
केली स्तुती जननि आजि यथामतीनं ।
दे भेट माय क्षण लोचन थामती न ॥
त्या द्रौपदीचि, विदुराचि कणींच भाजी ।
घे ही सुपारि भरडी चिकणीच माझी ॥६३॥
झाला अनंद शुभ-मंगल पाडव्याला ।
आनंदिचा सकळ जंगल पाड व्याला ॥
आली वसंततिलका लतिका मोहोरा ।
आई त्वरीत इकडे फिरवी मोहोरा ॥६४॥
संभावना पुजन भोजन दक्षिणाही ।
सूवर्ण-पत्र-फल-पुष्प, प्रदक्षिणाही ॥
श्रीरेणुकेप्रति समर्पुनि विष्णुदास ।
जोडोनि हात प्रितिच्या धुपवी उदास ॥६५॥

——— -——

## १३८ आर्या ( गीती )

—✱ ॐ ✱—

ये जगदंबे ! धांवत, टाकुन मागें करा[1]ल पत्र[2]न मैना ।
ह्मणतिल सुर त्वरित दिं या, आयोग्याचे किं[3]करा लपेत्र[4]न मनां[5] ॥१॥
या संकटिं ये पायीं, बाई ! तुजवीण प्राण तळमळती ।
वंदुनि नयनाश्रूनें, प्रक्षाळिन जरि स्वपादतळ मळती ॥२॥
जातें नयनाश्रूजळ माते ! तव अवक्रपादरों वाया ।
मज सन्मुख जगदंबे ! करि यास्तव अवक्रपाद सेवाया ॥३॥
नाहीं तसाऽपराधी भार्गवसा मीं तपीळ पद राशीं ।
यास्तव अंबे बसलों, बळकट घालीत पळि पदरासी ॥४॥
अइ ! तुजसाठीं गुरुची, जपतों जपमालिका मि नावडती ।
जैशी वश्य कराया, निजपतिला भजति कामि नावडती ॥५॥
श्रीमंत कामि गुंतुन, विसरशि गरिबाचि लाज राखाया ।
ताटापुढेंचि बसऱ्या, मिळतें उच्छिष्ट मांजरा खाया ॥६॥
आई बाई ह्मणतां, गोष्ट कधीं एक ही न आयकशी ।
झालिस कां ? जगदंबे, अगदिच अशि प्रेमहीन आइ कशी ॥७॥
तुज चिंतितांचि चित्तां, चिंता पाठीसि लाविली सगळी ।
मी तरि कशास घालूं, ऐशा निष्ठूर माउलीस गळीं ॥८॥

---

१ भयंकर २ वारा ३ मन ४ चाकराला ५ लपवून वे ६ नमस्कारानें ७ तळवे ८ सरळपाय.

अंबे ! वधूहि वधलिस, केलिस तनु नागवी प्रपंचांत ।
आतां तव नामें हा, मागतसे भीक विप्र पंचांत ॥९॥
त्वा जरि बहुविध चिंता,-संकट-दुःखेंहि दाविलीस मज ।
तरि मी शरण कुणाला, नाहीं जाणार, माउली समज ॥१०॥
सोडुनि कल्पलता ही, आतां कोठें मि जाउं दैवा ! रे ।
ह्मणताति संत येथें, सद्भाग्याचें सदा उदय वारें ॥११॥
पाय तुझे पाहूं दे, जोंवरि आहेत प्राण देहांत ।
बुडतों भवसागरिं या, काढ तुला माझि आण, दे हात ॥ १२ ॥
झाली मार्जर क्रीडा, परि मुषकांचें खरेंच मातेरें ।
यास्तव निगमाक्षरि तूं ! घडिघडि घालूं नकोचि मातेरें ॥ १३ ॥
जिव-धन-क्षय-कर्त्याची, काय करावी सुपाक-शाला हो ।
घातक चिंतामणिची, माता वैष्याचि त्या कशाला हो ॥१४॥
भार्गवरामाधिक म्यां, मोठा अपराध काय केला हो ।
पापी ह्मणूनि धरिला, चित्तिं तुझा माय रेणुके ! लाहो[1] ॥१५॥
छळितो मला अहाहा ! हा आहंकार काय हानिकर ।
उचित तुला जगदंबे ! मजवरती सांग काय हा निकर ॥१६॥
कविता करितां थकलों, घे लेखणी दौत आणि कागद गे ।
दे दर्शन जगदंबे ! देशी मजला बहूत कां ग दगे ॥१७॥
सुखसंवादें पुण्यश्लोकाच्या, मूळपीठ नायकिला ।
वाटे पापिष्टाचा, जातो लघुशब्द नीट नायकिला ॥१८॥

---

१. छंद.

भेटि न देतां मुक्ती, देशिल अंबे ! परी सवंगानें ।
किमयागार पुटाविण, काय करावा परीस वंगानें ॥१९॥
अंबे ! तुलाचि गावें, बोलावें तुजसि, या सुखापरतें ।
सूवर्णामृत भोजन, हें यापुढें तुच्छ मोक्ष खापर तें ॥२०॥
करुनि वधावा दुर्गे, त्वां आहंकार हा उपायशर्तें ।
महिषासुरमर्दिनि जें सत्यचि नानिन तुझें कृपा यश तें ॥२१॥
निज पदरानें झांकुनि, हा वंगळवाणि चांदि सोन्याची ।
तुमच्या सदनीं राहिल, काया सद्यात्रि चांदि सोन्याची ॥२२॥
आइनें छळक मुलाचीं, न करावी तोड फोड जोडावी ।
हातीं घ्यावा जरितो, घासुनिया हाड फोड जोडावी ॥२३॥
दुर्वासना हि गाढवि, दंडी दुर हाणिती उदंडाचि हो ।
त्यांतें हिं न मानी मग, मी तों दुर्बळ मुळीं अदंडचि हो ॥२४॥
मद-रानडुकराची, टक्कर सोसावयास मुसकल कीं ।
त्यांतुन त्या खवळीतो,लाउनि हा अधिक दुष्ट फुस कलकी॥२५॥
चंद्रापरी क्षमेची, शोभवि तप लक्षुमीं क्षमाशीला ।
यास्तव अवक्षमेच्या, वारावें तूं अभक्ष माशीला ॥२६॥
किति विनवूं जगदंबे ! करुणा तुज कांहिं यावयासाठीं ।
पहा भर ऊमर खचली, आलि जरा बाइ या वया साठी ॥२७॥
आनंदीच्या सदनीं, कल्पलता–द्रुम अराम अमराई ।
अक्षीय अनंद तेंथे, येईना यम हराम अमराई ॥ २८ ॥
मज माझ्या आइकडे, मजवर ममता असो नसोऽन्याची ।
साजणि काय करावी, माय परावी असोन सोन्याची ॥२९॥

मोठी उदार अंबा-बाई श्रुति जी वदे उदारांत ।
ती तूं कृपणाचि झालिस, काय तुझ्या जीव देउं दारांत ॥३०॥
पडला सुरनंदिनिच्या[१], आज दुधाचा घरांत तोटा कीं ? ।
जो दोष रोष योगचि, करुणेच्या सागरांत तो टाकी ॥ ३१ ॥
तूजपुढें मि ह्मणेना, मोक्षाचें राजतखत[२] कधि नामी ।
सुंदर रुप हें पाहिन, गाइन नाचेन तक्तक् धिन्ना मी ॥३२॥
तूं जगदंबे अपुलीं, मजला वर भक्ति दे वरायास ।
तुज ऐसी माय नसे, जगिं दुसऱ्या शक्ति देवरायास ॥३३॥
अपवर्ण संकराची, धड हिंदी ही न फारशी कविता ।
करितां उगें न राहे, हें मन मतिहीन फार शीकवितां ॥३४॥
तरि काय जाणुं जाणें, मायेची माय मावशी मामी ।
तूं माय रेणुके मज, मायेची माय मावशी मामी ॥३५॥
तूं दिनजननी ह्मणुनि, करितों मी इतकि दीन काकुलती ।
त्वां लाविलीस हृदयीं, चिंतेची रात्रदीन कां कुलती[३] ॥३६॥
कां मज सताविसी तूं, दीनाची माय होनें[४] दीनाला ।
घालुनि पोटीं अब्धी, निवडे तो काय हो नदी नाला ॥३७॥
आइ जगदंबे, जातों, मी होउनि स्ववपुनाश पतनासी ।
परि पतित पावनाची, त्वां, वहावी कीं पुन्हां शपथ नासी ॥३८॥
तूं हीं तशीच मी हीं, आलों आहों जसा तसा गांवा ।
हा अपमान मुखानें, काय तरी मानवांत सांगावा ॥३९॥

---

१ कामधेनुच्या २ राजसिंहासन ३ कोलतीं=चिस्तु. ४ होऊन=असून

अंबे ! भेटीवांचुनि, जाऊं येथूनि काय माघारीं ।
क्षुधितचि गगनीं जाती, येती बघतांच चंद्रमा घारीं ॥४०॥
माते ! कळेल तिकडे, जातों परि पाय एकदां दावीं ।
काय करूं गे पडला, बाप विधाता सदा कदा दांवी ॥४१॥
परि माय-लेंकराचा, लागुं नये वाद अन्य कानातें ।
तूं दिन जननी मी दिन, आहे अर्थात न्यून कां नातें ॥४२॥
अळ काढिल्या अईनें, ध्यावी मग कां न मुरड लेकानें ।
दुर्व्यसनांचे अगोदर, शिक्षेस्तव कां न मुरडले कान ॥४३॥
शरणांगतासि अंबे ! दे तव सन्मान कायदा साचा ।
विष्णूदास ह्मणे या, धरिसि न अभिमान काय दासाचा ॥४४॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

---

## १३९ कामदा

—* ॐ *—

जय नमोस्तुते श्री नमोस्तुते । अदि नमोस्तुते प्रार्थितों तुतें ।
जननि देशि कीं ! लक्ष ईकडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१॥
अदि भवोद्भवे विश्वनायके । तुज अनंत आनंत बालकें ।
तरि तयांत कां मीच नावडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥२॥
बहुत वाटे संसार व्यापसा । कुथिसि कां मला धावया पसा ।
तुजासि सोडुनी जाउं कुणिकडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥३॥

---

१ डाहा. २ खचित सांग तूं रेणुके ! गडे ॥ ( पाठभेद )

दुध दिल्या जरा क्षुधित मांजरा । तुजसि येइना काळिमा जरा ।
समिप पाळिल्या काय बीघडे ? । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४॥

ह्मणासि तूं मला माझें लेंकरूं । अशि वशकृती काय मी करूं ।
चटक चाटकें चूटकें कुडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥५॥

बहुत आसती लेंकुरें तुला । परि तुं एकचीं माउली मला ।
समचि तोलिसी कां न पारडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥६॥

नवार्सि द्रव्य घेऊन पावशी । तरि अम्हां कशी गे निभावशी ।
बधिर दूबळे अंध लंगडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥७॥

कटक कुंडलें गोफ साखळ्या । हार तुरे हिरे जाइच्या कळ्या ।
कुठुन आणुं मीं उंच लूगडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥८॥

असं सताविशी कां ग लेंकरा । अडुनि मागसी तूप शर्करा ।
वरण भात पोळ्या कढी वडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥९॥

जाडित दागिने घालिसी नवे । भुषण आइचें हें नव्हे नव्हे ।
मार्नि विचारुनी तूंचि रोकडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१०॥

रडत हिंडतों मी भयाभया । जवळ धांउनी ये बया बया ! ।
बघसि माय, निर्वाण केवढें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥११॥

पतित मी असे थोर पातकी । ह्मणुनि प्रार्थना बाइ ! ईतकी ।
कठिण हें तुला काय सांकडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१२॥

जननिची कृती चित्तिं नाठवे । अवत्सलीस कीं काय नूठवे ।
दिनदयाळ हें ब्रीद नावडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१३॥

भगवती मला कां न तारिसी । शरण आलिया काय मारिसी ।
तव कृपांबुधीं खंड कां पडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१४॥

अधिंच कामिनो शत्रु हा गळा । करिसि तूंहि कां कोप आगळा ।
वधिसि पाळुनी जेंवि शेरडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१५॥
जरि असाहि त्वां अंत पाहिला । तरि तुलाचि म्यां देह वाहिला ।
ढकलिसी मला कां पलीकडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१६॥
बहिण बाप तूं माय मावशी । सुशिल नाम हें कां गमावशी ।
किंव कशा न ये ऐकुनी रडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१७॥
बहिण द्रौपदी सचिदांबरें । स्वकरिं झांकिली श्रीपितांबरें ।
मजासि ठेविसी काय ऊघडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१८॥
खुटलि वाटची वाट पाहतां । अटलि शाइही पत्र लीहितां ।
करुं वृथा किती तोंड कोरडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥१९॥
कधिं उठोनि कैवारें चालसी । कधि बसूनि सन्नीध बोलसी ।
कधिं रडें तरी लाविसी कडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥२०॥
विषयव्याळ जंजाळ सोसेना । जळुनि जाइना द्वाड वासना ।
कधिं कुबुद्धिचें काढिसी मढें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥२१॥
बघुं न देति श्रीमूख रेखडें । स्वरिपु लोचनीं घालिती खडे ।
परि तुला कसें चैनची पडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥२२॥
मजवराची का, प्रेम थोडका । परशुरामची काय लाडका ।
भवधि तो तरे काय मी बुडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥२३॥
चतुर तूं गुणाची अई कशी । वचन एवढें कां न ऐकशी ।
करूं गती कशी मीं तुझ्यापुढें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥२४
उगिच कामदा वृत्त वांचणें । तव कृपेविना व्यर्थ वांचणें ।
पिळुन काय एरंड लांकडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥२५॥

स्तुतिच ऐकुनीया कृपा करी । प्रियचि मानुनी भाजि भाकरी ।
जशि दशीच चंद्रीं स्पृहा चढे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥२६॥
तुझि स्तुतीच तूं विश्वनायके । तुंचि वदोनियां तूंचि आयके ।
मज कशासि आढ्यत्व एवढें । खचित रेणुके० ॥ २७ ॥
कर धरूनि चालून चालवी । अपण बोलुनी बाळ बोलवीं ।
नवल मानुनी घेतसे पुढें । खचित रेणुके० ॥ २८ ॥
भुजगि भावना जों नुठेचि तीं । अइ लुचाडिचें तोंड ठेंचिती ।
शिशुसि धांवुनी घेतसे कडे । खचित रेणुके० ॥ २९ ॥
करिंच ब्रह्म येईल धुंडितां । आइ ! नये तुझें रीण फेडितां ।
पदतनासि[1] देतांहि चामडें । खचित रेणुके० ॥ ३० ॥
किति किती तुझे गूण आठवूं । किति किती कृपामृत साठवूं ।
किति किती गुणूं गूण आंकडे । खचित रेणुके० ॥ ३१ ॥
मिठ मिरें दहीं भात रायतें । वदनिं घालिसी ग्रास आयते ।
अवडि लेविसी टोपि अंगडें । खचित रेणुके० ॥ ३२ ॥
तुंचि ऋणी ऋणांतूनि काढिसी । जनन मृत्युचे पाश तोडिसी ।
समुळ शत्रुचे पाडसी हुडे । खचित रेणुके० ॥ ३३ ॥
शशिकले ! तुझें सत्य लेंकरूं । अमृत प्राशुनी पथ्य कां करूं ।
अवडतें न कां भक्षु वावडें । खचित रेणुके० ॥ ३४ ॥
सुरभिची मुखीं आलि कास या । करुं मनोरथीं वाणि कासया ।
विषयभूमि कां चाटुं पोपडे । खचित रेणुके० ॥ ३५ ॥

---

१ पायतनास=वाहणास.

फसवि लावि दाक्षायणी अशी । ह्मणति नाहिं नारायणी तशी ।
तरि मासि कशी गोष्ट ही घडे । खचित रेणुके० ॥ ३६ ॥
पद तळाब्जि जो रंग लालसा । नयनिं तो पहायाचि लालसा ।
कधिं तरी असें दैव ऊघडें । खचित रेणुके० ॥ ३७ ॥
कधिं धरून अद्वैत भावना । सम बघेन ब्रह्मांड भूवना ।
कधिं तरी असें दैव ऊघडें । खचित रेणुके० ॥ ३८ ॥
कधि टळोनि जाईल मीपणा । कांधं दिसेन मी मीच आपणा ।
कधिं तरी असें दैव ऊघडें । खचित रेणुके० ॥ ३९ ॥
कधि निराशनीं निंब वर्पुनी । काधिं अशाहि टाकीन कर्पुनी ।
काधिं तरी असें दैव ऊघडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४०॥
काधिं उपाधि होतील या मना । काधिं अरोग्य वाटेल या मना ।
काधिं तरी असें दैव ऊघडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४१॥
जिव रथस्थ मी नरतनूरथीं । अइ तुं होइ सद्बुद्धि सारथी ।
काधिं तरी असें दैव ऊघडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४२॥
मन चतुष्ट वाग्दोर घे करीं । फिरवि अश्व इंद्रीयसंगरीं ।
काधिं तरी असें दैव ऊघडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४३॥
वचकलों भ्रमें शत्रु भंगितां । भ्रम हरीतसे बोधुनी गिता ।
काधिं तरीं असें दैव ऊघडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४४॥
विजय वीजया वाणिं देउनी । बसवि आत्म स्वस्थानिं नेउनी ।
कधि तरी असें दैव ऊघडें । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४५॥
बहुत बोलणें कोण कोणचें । परम मिष्ट पक्वान्नि लोणचें ।
रुचति हे तुला शद्ब बोबडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४६॥

स्वगुण रत्न श्रीमाय शीकवी । मग नलाचि तूं मानसी कवी ।
कारिन पाठ सूकीर्तिचे धडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४७॥
शिशुसवें पदें माय घोकिं ती । मग दुराक्षरें हीं निघो किती ।
सुरस तीळ संक्रांतिचे पुडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४८॥
शिशुच शोभवी माउलीपण । सजल पारदा ऽ श्रीत दर्पण ।
असति कोटिच्या पोटिं शेंकडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥४९॥
खटकती तुझ्या पायिं जोडवीं । खट कपाळिं या बाइ जोडवी ।
खटाचि कां न होतील चोपडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥५०॥
प्रगटली महानंदि राजसा । दिनमणी अला मंदिरा जसा ।
लपति काजवे शत्रु ते किडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥५१॥
सुरभि कल्पवृक्षाचि साउली । सदय विष्णुदासाचि माउली ।
गरजती स्वयं सिद्ध चौघडे । खचित रेणुके ! सांग येवढें ॥५२॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

---

## १४० साक्या.

*

श्रीमुळपिठ वासिनी भवानी, येकविरे जगदंबे ।
रेणु राजाचे नंदिनि श्री, रेणुके विश्वकुटुंबे
रुचिकात्मज कांते। भृगुरामाचे माते ॥ १ ॥
आदि नमोस्तुते सकळारंभे, जगदंबे हेरंबे ।
नमोस्तुते सत्‌चित्‌घनबिंबे, हृदयकमल-निलयांबे ।
करुणामृत गंगे । अनंत मानस रंगे ॥ २ ॥

रत्नजडित-सिंहासन-मंडित अखंड ध्यान विराजे ।
चिंतिति देवी-देव-ऋषीगण, दानव मानवि राजे ।
सद्गुण वेल्हाळा । नमितों सहस्त्रवेळां ॥ ३ ॥
प्रसन्न श्रीमुखचंद्र वरद कर, नळ करुणामृत झरिचा ।
हिरवी कंचुकि पीत पितांबर, झोंक पदर भर जरिचा ।
बहुत सुगंधाची । उटि केशर गंधाची ॥ ४ ॥
बाळ्या बुगड्या काप कुंडलें, चमकति मोती भांगीं ।
तळमळती कविगुरु नक्षत्रें, ह्मणती आह्मि अभागीं ।
भ्रमणामधें पडलों । कोंदाणि नाहीं जडलों ॥ ५ ॥
शिरिं केकत मुदराखडि वाकी, नाकीं नथ-सरज्याची ।
दिपतीं नक्षत्रें न पावती चंद्र सूर्य सर ज्याची ।
पुष्पांच्या माळा । थाट त्रिभुवनीं अगळा ॥ ६ ॥
श्रीगुरु दत्तात्रेय-माउली, अनसूयेचे तनये ।
येई लवकर तुजविण या जिव-चैतन्या चेत न ये ।
दिगांबर नेसुन ये । पीतांबर नेसुन ये ॥ ७ ॥
पुरवि हेतु या असासि जरी तूं, माय दयाळु गड्याचा ।
दिगांबराहुनि मज बहु वाटे, अनंद या लुगड्याचा ।
शुभ कंकणपाणीं । कुंकुम कज्जल नयनीं ॥ ८ ॥
तूं आदिमाये प्रणवरूपिणी, विधि माधव मदनारी ।
तूं नर नारायण नारायणि, तूंचि ब्रह्म नर नारी ।
बोलावें जें जें । तें तें गडे तुज साजे ॥ ९ ॥

हे दिनजननी ! दीन बांधवा, दीनाच्या बापा हूं ।
घाल उडी दिन वत्सलतेचें, ब्रीद तुझें बा पाहूं ।
आहे मी दीन । झुरतों रात्रंदीन ॥ १० ॥
जयशंखासुरमर्दिनि येई, मीनेश्वरि आपक्षे ।
वेदास्तव उडि घालुनि उडवी, भवसिंधूजळ पक्षें ।
रक्षीं निर्वाणीं । निजवत्साची बाणी ॥ ११ ॥
येइ सुरासुर-नरवर-मोहिनि, अचल धरे कमठाई ।
सुरतरु चिंतामणि सुरभी धन, काय तुझ्या कम ठाईं ।
तूं अमृतपाणी । शुभवरदे कल्याणी ॥ १२ ॥
ये भगवंते ! महाबळवंते ! तुजपासून वराहे ।
भुक्ति मुक्तिचे भक्तीनें बुध, म्हणती वरचि वरा हे ।
पृथ्वीच्या वजना । तोलिशि तरि कां ? मज ना ॥ १३ ॥
ये नरसिंहे ! सुहास्य वदने ! ! तूं तरि नको गुरुगुरुची ।
आलिंगुनि मज अभयदान दे, तूं माउलि गुरुगुरुची ।
गुरगुरतो बोका । आत्मद्रोही बांका ॥ १४ ॥
ये ग वामने हळूहळूची, पाय तुझे गे चिमंणे ।
कोमल ह्मणुनी त्या तळिं तो बाळि, निज मस्तक दे चिमेणें ।
तेथें रमलीस । उभि राहुनि श्रमलीस ॥ १५ ॥
परशुधर श्री भार्गव रामें, एक्याची हांकेला ।
सहस्रार्जुन खलनिधिनें येउनि, स्वगृहिं अनर्थ केला ।
गमे दुःखाचि काविस । क्षतें पडलीं येकविस ॥ १६ ॥

---

१ सुकुमारे २ चिमुकलें.

कुठें गुंतली तरी कनकमृग, मारायासि अकेली ।
येई लौकर दशाननानें, हरण जानकी केली ।
जय श्री रघुवीरे । जयजय श्री एकवीरे ॥ १७ ॥
येग येग श्री घननीळे । देवकिचे तान्हाई ।
घोंगडि काठी वेणु शिदोरी, नसल्या चिंता नाहीं ।
नाटोपति गाई । कृष्णाबाइ अगाई ॥ १८ ॥
अखिलहिं अवताराची केली, श्री विकलित बहु ध्यान ।
प्रत्यक्ष पंढरपुरीं साजिरें, शोभे कलित बहु ध्यान ।
वद्धजनीं रंगे । ये आइ पांडुरंगे ॥ १९ ॥
अतांचि येऊन था नरतनुची, तूं प्रक्षाळि कलंकी ।
गुंतुनि पडशिल होशिल जेव्हां, पुढें अवतार कलंकी ।
आज लेंकरवाळी, मग होशिल करवाळी ॥ २० ॥
जय श्रीमहिषासूरमर्दिनी, श्रीवर्धिनि श्रीमंते ।
जय ब्रह्मेश्वरी माहेश्वरि जय, नारायणि भगवंते ।
स्वस्ति श्रीस्वस्ते । उदयोस्तु हृदयस्थे ॥ २१ ॥
हिमालयाची क्षिरसिंधूची, यज्ञाग्नीचि कुमारी ।
तूंचि द्रौपदी सीता तारा, अनुसूया सकुमारी ।
गुणवती अरुंधती । पतिव्रता दमयंती ॥ २२ ॥
आइ रेणुके कृष्णाबाई, गंगे गोदे यमुने ॥
मजसाठीं त्वां सत्वर यावें, क्षणभरि कोठें गमुं ने ॥
शोभति सकळ नद्या । पायिं जोडवीं वरुद्या ॥ २३ ॥

येग येग दीन दयाळे ! जगदंबे लवलाही ।
पतितपावने पतित मी आहे, पावन करि मजलाहीं ।
ये माझे आई । अळस नको करुं कांहीं ।। २४ ।।

संकटिं म्हणे ये कृष्णा कृष्णाबाई माझे आई ।
आइ जगदंबे तुला आइविण, उपमा देउं मी काई ।।
पाहुनि अपणाला । अठवि जननिपणाला ।। २५ ।।

भार्गवाचि सरि जरि नये आह्मी, आइचें लाविलें नातें ।
कपर्दीस तें कसें मिळेल जें, मोकलिलें हो नातें ।
कापीतांहि गळा । परंतु तो प्रिय अगळा ।। २६ ।।

आवडती पुढें नावडतीची, कुठुन दाद लागावी ।
समचि तिलाही असला गेला, उठुनि दादला गांवीं ।
न घडे संग तिला । सद्गुण ये व्यंग तिला ।। २७ ।।

नसतिस तूं ' दिन-जननी ' तरि हा, जगतीं पाठ कशाला ।
पडला असतां ? नसत्या शास्त्रादि श्रुति-पाठक शाला ।
धरितां शिरिं महिला । सोसवती न अहीला ।। २८ ।।

भार्गवाचि जाशि तशीच अमुची, नव्हती तूं कां गाई ।
वेद पुराणें कीर्तन भजनें, अभंग तूका गाई ।।
न वदे कधि ना ची । खरि तूं जननि दिनाची ।।२९।।

रात्रंदिन शतदां दिन-जननी, ह्मणतों मी दिनवाचें ।
एक वेळ तूं ' ओ ' ह्मणसिल तरि, सहज बहू दिन वांचे
मरतां मरतांहीं । पावेन अमरताही ।। ३० ।।

श्री भागीरथी भगीरथास्तव, भवलोकीं जी वाहे ।
वाटे कौतुक कीं तत्सम जगीं, अवलोकीं जीवा हे ।
ये अमुच्या कामा । त्यालिस भार्गवरामा ॥ ३१ ॥

कीं वाइट मी ह्मणुनी येतो, तुज माझाचि त्रसा ।
काय करूं जरि नीट चितारी, रंगवि ना चित्रास ।
मार्जि तुझी माते । ह्मणसी विद्रुप मातें ॥ ३२ ॥

मोठा शहाणा अथवा तान्हा, बालक यद्यपि त्याला ।
टाकुनि रक्षायास्तव येइल, माता मद्य पित्याला ॥
मूर्खाची मोठी । वाहे काळजि पोटीं ॥ ३३ ॥

तुझ्या रेणुके मंगल भुवनीं, लेश नसे आशिवाचा ।
गरज दिनाची नाहीं ह्मणुनी, बोलुं नये अशि वाचा ।
उचित हें माउलिला । करि कृपेच्या साउलिला ॥ ३४ ॥

लागलों साक्या दिंड्या आर्या, अरत्या परत्या गाया ।
घालिन गोंधळ पाहशिल जरि तूं, या उप्पर त्या गाया ।
भवानी जोगवा दे । वादे वा प्रतिवादे ॥ ३५ ॥

मूळपीठ स्थळ फार सुलभ परि, दुर्लभ मज वाटे कां ?
चढतो परंतु घसरुन पडतों, किंचित् द्यावा टेंका ।
प्रणितोदार्कें वहातो । वाट तुझी मी पहातों ॥ ३६ ॥

थकलों जगदंबे अडरानीं, कुठवर टकरा खाव्या ।
ज्याच्या त्यानी अपुल्या गाई, या नौटक राखाव्या ।
केल्या हावालीं । नाहि अतां अम्हि वाली ॥ ३७ ॥

---

१ खंड्याळ.

काय करूं मी तुजविण अंबे, बहु मानस कळकळतें ।
दिन जननीला दीन जनांचे, बहुमान सकळ कळते ।
यास्तव मजलाही । दे दर्शन लवलाही ॥ ३८ ॥

आइ जगदंबे अंबे अपुल्या, तूं नको लपवुं पदास ।
दे दर्शन मज अहो तुझ्या मी, दासाचा उप-दास ।
नलगे अणिक मला । दाखवि निजपदकमला ॥ ३९ ॥

तुज जगदंबे काय ह्मणावें । संचित अपुलें स्मरावें ।
सुत-विरहित-दशरथा-परीम्यां, अइ ! अइ, ह्मणुनि मरावें ।
आलें या ओघा । या पृथ्वीवर दोघां ॥ ४० ॥

हे षड्रिपु वृक व्याघ्र उग्र मज, लागलेति गांजाया ।
कोठें पंचाननें ! बाळकें, गुंतलीस पाजाया ॥
करातिल हे गट कीं । सत्वर ये या घटकीं ॥ ४१ ॥

हे शत्रू तुज हांक मारितां, कर्षित अधिक पाशीं ।
स्वाति जळानें जन्माति मोती, परि पडे व्याधि कपाशीं ।
अमृत कां ? हो ! तें । राहुसि विषवत् होतें ॥ ४२ ॥

तुझ्या समक्षाचि शत्रु कांपिती, दुःसह साही मान ।
राहिल जननीगृहीं अशानें, परि सहसाही मान ।
पुनरपि नयेचि घडी । होइल बिघडा बिघडी ॥ ४३ ॥

अफु देउनिया निजवी अवधीं, लेंकुरें लेंकुरवाळें
मजसाठीं ये हळुं नको वाजवुं, कंकण नूपुर वाळें
अडविल बहुजागीं । होइल पृथ्वी जागी ॥ ४४ ॥

जडमुढ कटिं खांदीं व्यागविशी, जो ह्मणेलचि नमो त्याला ।
अन्योन्यहि भूषण परि कळ त्या नाकाचि न मोत्याला ।
अवड नसे सवती । म्हणुनि कष्ट सोसवती ॥ ४५ ॥
घातले लक्षावधि जगदंबे, जरि ब्राह्मण जेवाया ।
जाइल सत्वचि एक उपासी, गेला ह्मणजे वांया ।
आणुनि लक्षांत । बैसविसी लक्षांत ॥ ४६ ॥
जननिपणाच्या विव्रइ उणेपण, घेउन दे उनमत्ता ।
कथिलें कलिसी या विश्रांति घेउन दे उनमत्ता ।
गति भोंवऱ्या ऐशीं । करि फिरवी चौऱ्याएशीं ॥ ४७ ॥
ओळख माझी होति तुला तरि, तुझि या अधमा नव्हती ।
अनंत जन्मींचे मज्जननी, परि कैसे वध मानवती ।
लाभलि नरकाया । लोटुं नको नरका या ॥ ४८ ॥
दुर्लभ नर जन्मासी आलो, त्यांतुनि मी ब्राह्मण कीं ।
मारुंनको कुल भ्रष्टचि ह्मणुनी तारुंन कुब्राह्मणकीं ।
भव दुष्कर्मातें । माझ्या दुष्कर्मा तें ॥ ४९ ॥
न लगे जप तप यज्ञ दान धन, जननीच्या अवतारा ।
ह्मणुनी अंबाबाइ तुह्मासी, ह्मणतों 'तारा' 'तारा' ।
आग्रह ह्मणुनि पुरें । गर्जति सत् पद नुपुरें ॥ ५० ॥
नमनादित्याऽभिषेक शिवाला, अर्चनप्रिय घननीळा ॥
भोजन विप्रा प्रीय तसेंची, 'आइ' म्हणणें जननीला ॥
कितीचे लेखोटे । कोणाचें म्हणेल खोटें ॥ ५१ ॥

---

१ लेख

सांप्रतकाळीं अशीच फिरली, मर्जि काय देवाची ॥
सोडुनि वेदाध्ययन ब्राह्मण, अर्जि कायदे वाची ॥
सोंवळें आटोपी । पायीं बुट शिरिं टोपी ॥ ५२ ॥

कली वाढला धर्मबुडाला, नितिवर पडला छापा ॥
पावलि गायत्री गति वंध्या, संध्या ह्मणती छापा ॥
हातीं दारुचिं पात्रें । लोपलीं अग्निहोत्रें ॥ ५३ ॥

संतसमागम अतां कशाचा? अवघा कीरस्तान ॥
झालि असार्थक गति या लोकीं, परलोकीं रस्ता न ॥
भरि पडली स्वहितां । पशुवत विकिती दुहिता ॥ ५४ ॥

कोतवाली ऋणकरी शिपाई, जमादार आमीन ॥
मीन असते तरी जागृत राहतें झोंपी जाति अमीन ॥
चोरांच्या गस्ती । फिरती रस्तोरस्तीं ॥ ५५ ॥

हुजूर तहशिलदार तपाशिली, कोतवालि अमिनाही ॥
अरोपि यानें कबूल व्हावें, बोलावें अम्हि नाहीं ॥
चोरांचे शाहू, कर म्हणती पैशा हूं ॥ ५६ ॥
हा जिवजावो अथवा राहो, परीन हरपो पैसा ॥
पैशासाठीं बाळ कापिती, शिव हरहर हा पैसा ॥
देवहि पैशाला ॥ पावति बघुन दुशाला ॥ ५७ ॥

आइ त्वां दिधला जन्म कशाला, राज्यामध्यें या कलिच्या ॥
दुर्धर सागर तरावयाला, गति खुंटाति अक-लीच्या ॥
त्वा हें जाणावें ॥ आम्ही काय म्हणावें ॥ ५८ ॥

त्या युगिं भवनिधि तारक ज्या गुण, कीर्तींच्या नावा या ॥
या कलियुगिं त्या तुमच्या पातक, भरतींच्या नांवा या ॥
डळमळती भारी ॥ तळमळती व्यापारी ॥ ५९ ॥
तरल्या जळ सागरीं न होतां, फाका फाक शिळांची ॥
भव सागरिं तो गुणामृताचा, झाला पाक शिळाची ॥
पसरितों आ तांका ॥ तूं लपसी आतां कां ॥ ६० ॥
मुक्ता मुक्ती घालणें आयत्या, पिष्टांच्या रांगोळ्या ॥
दाविसि अंगुष्टा दडपूनी, पापिष्टांचारांऽगोळ्या ॥
ग्रंथाक्षरें काळीं । दिसती सांप्रतकाळीं ॥ ६१ ॥
ज्यांसि नसे धनिवाली त्याला, कोणींही धोंपटतो ॥
कैंचा न्यायान्यायाचि पडला, राजमार्ग धोपट तो ॥
मी अनुभवलो कीं ॥ तूं दिन जननि विलोकीं ॥ ६२ ॥
मद्रिपूसहि सांगसी मला दृढ, बांधुनिया शिक्षाया ॥
मज म्हणसी रिपु जिंकशील तरि, मी येइन रक्षाया ॥
हा तुजला न्याय ॥ दिसतो कीं अन्याय ॥ ६३ ॥
न सुटे मजला दृढ काळानें, कंठिं घातली फाशी ।
सोडविशील मज म्हणुनी आलों, जगदंबे तुजपाशीं ॥
प्रार्थितों निर्वाणीं । पाव अतां निर्वाणीं ॥ ६४ ॥
काय म्हणावें तुला रेणुके, आइ तूं सदय शहाणी ॥
उपेक्षुनीया मज न करावी, अपुली सयश-हानी ॥
हेंचि निरिक्षावें ॥ मातुश्री रक्षावें ॥ ६५ ॥

मोह मायेच्या पंकीं फसलों, बसलों हांकित माशा ॥
कळून आला मज अदिमाये, तुझाचि हा कि तमाशा ॥
किति तरि दासा या ॥ लाविसि मुख वासाया ॥ ६६ ॥

खचित तुझ्या जगदंबे आज्ञे-वांचुनि पान न हाले ॥
विधि हरिहर तव अंकीं करुनीं, अमृत पान नहाले ॥
तूं मूळ शिराणी ॥ ब्रम्हांडाची राणी ॥ ६७ ॥

कोण करिल अदिमाये तुझिया, अवज्ञा नेमाची ॥
तुझिया निज वत्साकडे पहाया, मगदुर काय यमाची ॥
विघ्नें दुर पळतीं ॥ असंख्य पापें जळती ॥ ६८ ॥

तूं दिनजननी नसाशिल मज या, कळतें कठिण प्रसंगीं ॥
आला नाहीं दीनपणाकीं, अझुनी माझ्या अंगीं ॥
संशय अकळेना ॥ हें मुळवर्म कळेना ॥ ६९ ॥

खाचिताचि व्हावें दीन अधीं मग, तुज 'दिनजननि' म्हणावे॥
जोंवरि अहंकाराचि तोंवरी, अभिमानांत गणावें ॥
दया तुज येईना ॥ अहंकार जाइना ॥ ७० ॥

अहंकार अम्हि परिहरिल्या मग, त्वां दुर्गे भेटावें ॥
पद्मिणिनें रजनी तम गिळिल्या, मग रविनें प्रगटावें ॥
उलटा अविचार ॥ नाहीं नीट प्रचार ॥ ७१ ॥

तरि जगदंबे मज शत्रूंनीं, घातलें कसें बंदींत ॥
तव गुण गाउनि असतां नित्यचि, चरण तुझे वंदीत
न त्यांची प्राज्ञा । शतदां तुझीच आज्ञा ॥ ७२ ॥

न्यायान्यायन दूत पाहती, मुख्य हुकुम रायाचा ॥
बंदि-गृहांतुनि सोडायाचा, अथवा मारायाचा ॥
दोषांची गाथा ॥ अवघी प्रभुच्या माथां ॥ ७३ ॥
गांजिति दुर्जन तव अनुमतें, असें मज पुष्कळ कळतें ॥
ना चले सत्तेपुढें शहाणपण, बहु बोलणें बाष्कळ तें ॥
आइ तूं आइ ऐसी । वाग, नव्हे रित ऐसी । ७४ ॥
निच यवनीच्या संगें पडलें, निज लेंकरुं वाळींत ॥
ऐसें समजुन स्वयें भागिरथी, धांउनि कुरवाळींत ॥
दुरितें सकळ हरी ॥ प्रसिद्ध गंगालहरी ॥ ७५ ॥
यमुना भागीरथी सरस्वति, तारिति संगमीं मरतां ॥
तूं जगदंबे नमनें देशी, भक्तासी आमरता ॥
देती या पक्षीं ॥ वेद पुराणीं साक्षी ॥ ७६ ॥
अंबे तुज दिनजननी म्हणावें, नाहीं उचित नरा हें ॥
जननी नामोच्चारा आधीं दीनत्व खचित न राहे ॥
रवि-उदयापूर्वी ॥ सांडितसे निशि, उर्वी ॥ ७७ ॥
मिळेल अभाग्या सौभाग्यें, तुझि धुळ पदकमलाची ॥
भाग्यवान तरि सभाग्य म्हणतिल, तुजहुनि अधिक मलाची ॥
सोनें परि साचें ॥ तें भूषण परिसाचें ॥ ७८ ॥
सांपडलीया जग जिवनाची, गंगाबाइ मिना ही ॥
जाणारा अन्योदार्कि आतां, मी नाहीं मी नाहीं ॥
अटकेना मि गळीं ॥ अलि अमिषाची उगळी ॥ ७९ ॥

मी तुझें लेंकरुं माझि माउली, तूं जगदंबा साची ॥
सोडुनि कल्पतरुंची छाया, मज नलगे बासाची ॥
कळलें मज पुरतें ॥ हें सोनें खापर तें ॥ ८० ॥
भक्ति रसापुढें सुरस रुचि दुजी न गमे रेणूकेला ॥
काय देउं उतराइ इनें नग, मेरुचि रेणू केला ॥
प्रेमें लाडविलें ॥ प्रेमानें वाढविलें ॥ ८१ ॥
सकळहि धर्माचें श्रय घडतें, मातृचरण नमनानें ॥
तरी आइचें उणें सुतानें, कल्पावें न मनानें ॥
सुमती पर्णावें ॥ आइचे गुण वर्णावे ॥ ८२ ॥
खरि जगदंबे आइ तुं साची, विसाव्याची विसावी ॥
कधि मजला देशील विसावा, घसरलि तिसरि विसावी ॥
लागली क्षरु चवथी ॥ चंद्रकळा जणुं चवथी ॥ ८३ ॥
तूं जगदंबे बंधुबाप आइ, गुरु शतपट भगवान ॥
पात्र मलातरि जपतप साधन, करितां पट भगवा न ॥
मग या उपकारा ॥ नाहीं पारावारा ॥ ८४ ॥
जोंवरि देशि न भेटि तोंवरी, घालिन मी बा दंगा ॥
काय करूं परि वितंडवादी, मधेंचि करिती दंगा ॥
ह्मणुनी तडफडतों ॥ तुझिया पायां पडतों ॥ ८५ ॥
जोंवरि नाहीं भक्ति तोंवरी, भुक्तीची खटपट ती ॥
एकादशिहुनि बहु द्वादशिची, घंटापळि खटपटती ॥
त्रासाचि साराचा ॥ लोभचि संसाराचा ॥ ८६ ॥

पुरुष शक्ति आणि ब्रह्म ह्मणावें, संकेतें तो ती तें ॥
सृष्टि चालवित स्वयें बोलवित, जणु तोता तोतींतें ॥
अभाव एकाचा ॥ भास गमे अनेकाचा ॥ ८७ ॥

रुची दिसेना नयनांसी परि, दिसें गुळाचा भेला ॥
चाखुनिया रुचि पहातसे परि, न दिसे गूळ जिभेला ॥
शैवाचि शिव ह्मणती ॥ शाक्त शक्ति गुण गणती ॥ ८८ ॥

तुझ्या गुणाचें गणित मला जरि, नाहीं लागायाचें ॥
तरी जसें येइल तसेंचि, गाणें, हें आइला गायाचें ॥
अक्षयीं आनंदें ॥ पाहिन तुज आनंदे ॥ ८९ ॥

ह्मणाशिल निंदास्तुतिपर ऐशा, चाटूं कां कवितेला ॥
योजक युक्त पदार्थी योजुनि, सेविति काकवि तेलां ॥
भिन्नपणा ताटीं ॥ परि संगम घडे पोटीं ॥ ९० ॥

हा जगदंबे तुझ्या पसंतिस, वाटे नयें कवि चार ॥
काय करावें मला कळेना, कांहीं एक विचार ॥
कसें अठवूं पाय ॥ हरला सर्व उपाय ॥ ९१ ॥

मी एकाकी वेदधर्म हिन, कर्म न न्यास ध्यान ॥
षड्रिपु ह्मणती चक्रि धनंजय, अभिमन्या सध्या न ॥
दुःख हें कानांही ॥ ऐकुं येत कां नाहीं ॥ ९२ ॥

काय करावें अतां मरावें, म्यां शतशा वांचून ॥
या भवचक्रीं जवळ नये जन, हित शतशा वांचून ॥
करुणा येवोदे ॥ कृष्णाबाई ओ दे ॥ ९३ ॥

हस्त मस्तकीं दस्त करूनी, दुर्गे तूं मग दुरहो ॥
वक्र पहाया महाकाळाचि, काय असे मगदुर हो ॥
पाप्याच्या कामीं ॥ कां नसे वेळ रिकामी ॥ ९४ ॥

मी जगदंबे जरी अहो तरि, पाप-धनाची-कोठी ॥
वाढवीन परि तुझी माउली, पूर्ण क्षमेची कोठी ॥
दे रस गाण्याला ॥ लावीं उस घाण्याला ॥ ९५ ॥

तूं जगदंबे हें रडगाणें, माझें लावि कडेला ॥
भिड सोडुनि तरि कडेलोट करि, अथवा घेइ कडेला ॥
उगीच रडवींसी ॥ तारिसि ना बुडवींसी ॥ ९६ ॥

ह्मणसिल कधितरि कृपा हि होइल, पायधरुन बसल्यानं ॥
औषध वैद्याचें गुण देइल, अयुष्य बळ असल्यानं ॥
हें बोलणें फोल ॥ नसे कृपेची ओल ॥ ९७ ॥

किंवा ह्मणसिल मोक्षाचि देइन, करुं नको चिंता कांहीं ॥
धाडुन देइल दूध कायती, जीं वंची-ताकाही ॥
समजुत मूर्खाची ॥ भेट न देसि फुकाची ॥ ९८॥

परंतु भुवनत्रयीं कोणगे, ह्मणेल मजला खोटा ॥
त्रिभुवनराणीच्या नांवाचा, जवळ समज लाखोटा ॥
दौंडी पिटवीन ॥ गूण तुझे अठवीन ॥ ९९ ॥

नको अबोला धरुं जगदंबे, करि करुणा ये, ' ओ ' दे ॥
या संगमिं भाग्योदय रविचा, रथ अरुणा येवोदे ॥
कितिरे दुर्दैवा ॥ करविसि देवा देवा ॥ १०० ॥

ऐकूं येइल विनंति तुमच्या, कधिं हो कानाला हो ॥
सिंधु परी मज घ्या पोटीं मीं, नदि हो कां नाला हो ॥
नांवाची अवडी ॥ करुं नये निवडा निवडी ॥ १०१ ॥

पहात बसलों प्रभु नांवाची, आणि पापाचि लढाई ॥
जें निजबळें मज ओढुन नेइल, गाइन त्याचि बढाई ॥
नसोचि भलल्याला ॥ लज्ज्या ज्याची त्याला ॥ १०२ ॥

हरहर म्हणतों परंतु मरतों, मिच पापी जगतांत ॥
प्रभुच्या नामामृत-पानें षट्शास्त्र वेद जगतात ॥
सांगूं गाऱ्हाणें । कुणासि लाजिरवाणें ॥ १०३ ॥

अजवरी वियोगाचा केला, आइ दंडचि न रडे हो ॥
आतां गिळितां त्या काळाचे, शतखंडचि नरडें हो ॥
अनंत नवसांची ॥ भेटी बहु दिवसाची ॥ १०४ ॥

इथेंचि माझी प्रयाग काशी, भक्तिविना अळसानें ॥
म्हणतों जरि तरि मन्मत-मंदिर, कल्पलते कळसानें ॥
म्हणतिल तुज शहाणे । निज नांवाकडे पहाणें ॥१०५॥

वरचेवर निट जननि मुलासीं, केशापरि सांवरती ॥
लोह अमंगळ जसें दिसेना, सहसा परिसावरती ॥
आइला ये वळका ॥ म्हणतां बेटा ‘ मळका ’ ॥ १०६ ॥

बहु श्रमलों मी, बहु भ्रमलों मी, स्वहितांसी मुकलों मी ॥
दिन झालों मीं शरण अलों मी, जगदंबे चुकलों मी ॥
पंकीं फसलों मी ॥ पाय धरुन बसलों मीं ॥ १०७ ॥

आरडतों मी ओरडतों मी, तुजविण तडफडतो मी ॥
वर चढतों मी तळिं पडतों मी, व्यर्थाचे बडबडतों मी ॥
पाया पडतों मीं । भवसागरिं बुडतो मी ॥ १०८ ॥
कळेल तैसें गुण गातों मी, बहुदुःखाचे सहातों मी ॥
निर्भिड मी निर्भय होतों मी, प्राण तुला व्हातों मी ॥
पाठिसिं दडतों मी ॥ षड्रिपुसी लढतों मी ॥ १०९ ॥
मनिं झुरतों मीं तुज स्मरतों मी, जगदंबे मरतों मी ॥
धरणें द्वारामधें बसतो मी, पदर तुझा धरतों मी ॥
उगाचि रहातों मी ॥ चरित्र तुझें पहातों मी ॥ ११० ॥
दाता तूंची त्राता तूंची पतीत पावन तूंची ॥
पूर्ण ब्रम्ह सनातन तूंची, जगिं जगजीवन तूंची ॥
भूताकृति तूंची । प्रकृति विकृति तूंची ॥ १११ ॥
बालक तूंचीं पालक तूंची चालक मालक तूंची ॥
तारक तूंची मारक तूंची ॥ भवाब्धिपारक तूंची ॥
गृहवर्धन तूंची ॥ पापपुण्य धन तूंची ॥ ११२ ॥
देवहि तूंची देविहि तूंची, शिव गणपति, गण तूंची ॥
विश्वीं विश्वेश्वरही तूंची ॥ विश्वपटांगण तूंची ॥
कमळापति तूंची ॥ कमलोद्भवही तूंची ॥ ११३ ॥
लक्ष्मी तूंची पार्वति तूंची, श्रीसावित्री तूंची ॥
सरितां तीर्थें यज्ञदान व्रत, जप गायत्री तूंची ॥
शुभाशूभ तूंची ॥ सुलभ दुर्लभ तूंची ॥ ११४ ॥

मुक्ती मुक्ती भक्ती तूंची, भक्ताभक्तहि तूंची ॥
शक्ती व्यक्ती उक्तीत्युक्ती, व्यक्ताव्यक्तहि तूंची ॥
क्षरअक्षर तूंची ॥ सृष्टिचराचर तूंची ॥ ११५ ॥

मूर्ख मुलाची अळ काढाया, तूंचि माउली बांकी ॥
ठेउं नकोची किरकिर आतां, माझी कांहीं बाकी ॥
तुज माझी आण ॥ दयाक्षमा मनीं आण ॥ १६ ॥

क्षमाचि करणें ही जननीच्या, संपादणि वेषाची ॥
लागुं न दे तूं रेणुके, अंगीं, मळि रागद्वेषाची ॥
त्वां निट वागावें ॥ असें म्यां कसें सांगावें ॥ ११७ ॥

अन्नपूर्णेच्या पुत्रानें पर-घरिं भिक मागावी कां ॥
अपुल्या अइची तरि वंचक कृति, जगांत सांगावी कां ॥
अडचण दोहिकडे ॥ इकडे अड दरि तिकडे ॥ ११८ ॥

करि संरक्षण अतां उपेक्षा, नकरी पुरवि अशाची ॥
असेच जडमुढ तारुनि लीला, केल्यापूर्वें अशाची ॥
निज नांवासाठीं । गोष्ट नव्हे ती खोटी ॥ ११९ ॥

संरक्षिलि ती श्रीहरिनें निज, नांवाच्या अभिमानें ॥
जी पांचाळी उपेक्षिली खळ, सभेंत पार्थभिमानें ॥
आटक धर्माची ॥ परि रित आधर्माची ॥ १२० ॥

श्रीकृष्णानें कृष्णेची तनु, झांकिलि चटकपटानें ॥
कृष्णाचि केलीं त्यांचीं त्यांच्या, वदनें चट कपटानें ॥
भक्तांचा महिमा ॥ वाढविसी विश्रामा ॥ १२१ ॥

तूं पार्थांकित असति तसाची, देशि मान वेदांसी ॥
दास्यत्वासि न लाजशि तुजती, अधिक मानत्वे दासी ॥
भक्तीची गोडी ॥ यास्तव घाशिसि घोडीं ॥ १२२ ॥
भक्तासाठीं मजवर करुणा, तूं करते कां नाहीं ? ॥
कैसाहिं असो मी दुर्बुद्धी, मंद अंध काणाही ॥
भक्तांच्या वचनां ॥ घोकुनि करितों सुचना ॥ १२३ ॥
भक्तप्रिय तूं तुकारामकृत, देशि अभंगा मान ॥
त्वां मजकडे पाहून करावा, मजवर हंगामा न ॥
आहों जासुद मी ॥ साधु असो कीं अधमी ॥ १२४ ॥
अवगुण पाहुं नये पुत्राचा, जासुद गुरु अतिथीचा ॥
वडिलापरि वंदावा तिर्थीचा, अथवा द्विज अतिर्थीचा ॥
असे असति धारे[1] ॥ शास्त्रांच्या आधारें ॥ १२५ ॥
तुकारामकृत अभंग बारा, पढलों वर्षे बाराहो ॥
आतां माझ्या हृदयीं राहो, कीं न विठोबा राहो ॥
तळमळ तरि कां ? मी । करुं तरि चित्तिं रिकामी ॥१२६॥
निज भक्तांच्या वचनासाठीं, निश्चित ठाईं ठाईं ॥
नानास्वरुपानें अवतरलिस, तूं जगदंबे विठाई ॥
स्तुति ऐकासि कां न ॥ मजकडे देशि न कान ॥ १२७ ॥
माझे लक्षुनि दोष मोडिसी, भक्तांच्या वचनासी ॥
परी शर्करायुक्त क्षिरीची, स्वाद रुच्या वचनासी ॥
शद्वचि शद्वाला ॥ लागेल डाग ब्रिदाला ॥ १२८ ॥

---

१ नियम.

सहस्त्र नामासहित अभंगाचे, करितो द्वादश पाठ ॥
मजकडे अजुनी कां न पाहसी, बसलिस करुनी पाठ ॥
प्रसन्न मि होईना ॥ म्हणशिल तरि भक्तहिना ॥ १२९ ॥

अभंग वाणी पढलों मी तुझि, आइ भक्ती वाढाया ॥
येतिस अमृत रस ठेवुनि विष, कां मजप्रति वाढाया ॥
भक्ती मागाया । लागलों मी गुणगाया ॥ १३० ॥

अतिथि द्वारीं अलों मला दे, प्रेम जोगवा दान ॥
सतावितां दात्यानें वाढतो, व्यर्थ वाद वादानं ॥
रात्रंदिन त्रास ॥ नये झोंप नेत्रास ॥ १३१ ॥
कृपणाचि झाली लागलि नवि कर, अखडावा संवय तिला ॥
कर अखडिल तर कासव होइल, म्हणातिल वा सवय तिला ॥
लोकांच्या तोंडा । काय देउं आई धोंडा ॥ १३२ ॥

तुज श्रमवाया व्यर्थ जन्मलों गर्भिंच गळलों कां न ? ॥
वाटल वंगळ आइ तुज म्हणतां, मज वंगळ लोकानं ॥
वाइट दोघांस ॥ घाल मुखीं दो घांस ॥ १३३ ॥
कोरडि भाकर चारी मारी, जरि अइ अन्नपुर्णाचि ॥
सरसचि परि तीं निरस पराची, तुपपोळी पुरणाची ॥
पिंडची मासाचा ॥ अखंड प्रेमा साचा ॥ १३४ ॥

जसा पदर निज आइचा नादर, मुलांसि हतभर पुरतो ॥
पराइचा चौफाळि पदर तसा, न दिसेची भरपुर तो ॥
दोस्ताचें लुगडें ॥ परिगतींपण उघडें ॥ १३५ ॥

गवत झोंपडी बरी मुलासी, आइची सत राखणाची ॥
नसे उपयोगीं मात्रशिची हीं, हवेलि सतरा खणाची ॥
ग्रामक हाजर ॥ आइविण तो बाजार ॥ १३६ ॥

सुखदु:खाच्या समयिं समानचि, आइचि मुलावर माया ॥
विपत्ति काळीं येति न कामीं, लग्नाच्या वरमाया ॥
कोणि न कोणाचे ॥ साथि उदर भरणाचे ॥ १३७ ॥

जेंजें पाहिन मी स्थुळ सूक्ष्म, रुप अणुरेणू कांहीं ॥
तेंतें आहे ह्मणे न माझी, माउलि रेणूका ही ॥
लागो हें ध्यान ॥ तुझेंचि अनुसंधान ॥ १३८ ॥

देदे प्रेमामृत पी पी ह्मण, प्रेमाच्या वाटीनं ॥
घेघे प्रेमाची खडि साखर, प्रेमानें वाटीनं ॥
प्रेमाची प्रेमाला ॥ घेउनि या प्रेमाला ॥ १३९ ॥

विस्मृति विषयाची पडो जैशी, मेल्यावर देहाची ॥
चित्तिं तुझी जडो मूर्ति रेणुके, मजला वर दे हाची ॥
नित्य सदाचरणीं ॥ ठेवीन मस्तक चरणीं ॥ १४० ॥

भक्ति वांचुनी परी युक्तिच्या, सकल कळा त्रिकळाची ॥
भक्तीसाठीं जगदंबे म्यां, जीव तुला विकलाची ॥
सतत गुलामाला ॥ लावी निज कामाला ॥ १४१ ॥

मी जगदंबे तुजला गाणें, कळेल तसें गाईन ॥
परि वत्साच्या दर हंब्रीं प्रति, हंब्रावें गाईनं ॥
न दिसे मग न्यून्या ॥ हें सुखकर अन्योन्या ॥ १४२ ॥

रत्न खचित नग तुला मि घडविन, उचित सर्व साकीनं ॥
सांग मला तुज असे जगदंबे, खचित भरोसा कीं न ? ॥
अजवर बहु लटकें ॥ बोललों घटके घटकें ॥ १४३ ॥
हा पद जडिताचा घे काळ्या, सूत्राच्या सम हार ॥
आई रेणुके पहा यासाठीं, झाला देव महार ॥
तूं तरि सगुणाची । दृष्टि न घे कोणाची ॥ १४४ ॥
अनाथ नाथ- गळीं पडल्या तरि, अनाथ जननि करानें ॥
विष्णुदास ह्मणें देउं नये बाळि, सनाथ जन निकरानें ॥
येवढी अनंती ॥ वारंवार विनंती ॥ १४५ ॥

ॐ । ॐ ॥ ॐ ॥।

---

## स्फुट.

—* ॐ *—

### १४१ मारुतीचे नमस्कार (दिंड्या).

चिरंजीव मारुती ब्रह्मचारी । शिरीं आज्ञा वंदिती वेदचारी ।
आकरावा श्रीरुद्र आवतार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥१॥
हरे वीष घोकितां रामवाचा। ह्मणूनीयां महादेव राघवाचा ।
दूत होय फेडाया उपकार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥२॥
अती लावण्य रूप वज्रदेही । कटीबंद कौपीन अंदु पायीं ।
उठे धरणी ताडितां झणत्कार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥३॥

---

१ रेणुके.

रत्न मुगुट कुंडलें तळपताती । भुजादंड प्रचंड शोभताती ।
पुष्पमाळा सूवर्ण अलंकार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥४॥
बाळपणिं त्या ग्रासिलें रवीबिंबा। मोडियेले आशोक वन कदंबा ।
संहारीले राक्षस दळभार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥५॥
सुवर्णाची जाळूनि बळें लंका । ऊर्ध्व उचलीला इंद्रजीत काका
वज्रमुष्टीचा मार अनीवार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥६॥
अहीमही लाऊनि मृत्युपंथा । सोडवीले सौमित्र रघूनाथा ।
पाताळाचें लंघुनी उडेद्वार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥७॥
बळसिंधू समर्थ असा कोण । क्षणामाजी आणिला गिरींद्रोण ।
दाखवीला अद्भूत चमत्कार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥८॥
अनीवार सूटले रामबाण । रणीं केलें रावणा गतप्राण ।
जयजयकारें कपि देति बुभुःकार । तया माझा साष्टांग नमस्कार॥९॥
अवतार राघवें संपवीतां । नीरवीलें शेवटीं हनूमंता ।
रक्षि, माझे भक्तांसि दे, अधार । तया माझा साष्टांग नमस्कार॥१०॥
देव-सीतेचा-बंध मोकलीला । भावें गाती सद्भक्त लोक लीला ।
विष्णुदासाचा नित्य शतवार । तया माझा साष्टांग नमस्कार ॥११॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

## १४२ श्लोक.

श्रीस्वामी अदिनाथ सद्गुरु महा, श्रीचिन्मयानंद हो ।
शिष्याच्या फुटल्या बिजांतुनिचिया, शाखा लता कंदहो ।
त्यांचे सद्रस सेवितांचि हरती, नाना [१]गेदांच्याऽपदा ।
आलों यास्तव मी सदा शरण या, श्री चिन्मयाच्या पदा ॥१॥

---

१ रोगांच्या आपदा.

श्रीऔदुंबर क्षेत्र सिद्धपिठ हें, वैकुंठची दूसरें ।
श्रीसिद्धाश्रमिं देहभाव विसरे, संसारसिंधू सरे ॥
श्रीज्ञानेश्वरि नित्य भागवत वा, अध्यात्म रामायण ।
श्रीस्वामी अवतार गोचर प्रभू, साक्षात नारायण ॥ २ ॥
वाराया अपदा अलों शरण या, सिद्धाश्रमाच्या पदा ।
गंगासेचन धूपदीप सूमनें, सूवर्ण गंधाक्षदा ।
साष्टांगें करितों प्रणाम कर मी, जोडोनियां लक्षदां
ब्रह्मानंद पदारविंद हृदयीं, राहो सदा सर्वदा ॥३॥
गुरूसि गुरुच्या कृपें, पृथिविछंद हा गाइला ।
सवत्स गुरु गोचरा, नमुनियां अहा गाइला ।
गुरूहि गुरुची पुजा, उदक पुष्प श्रीगंध हो ।
प्रसन्न गुरु चिन्मया, सहज सच्चिदानंद हो ॥ ४ ॥
भवनदिंतुनि ओढी, देउनी हात काढी ।
भवभय दुर धाडी, जन्ममृत्यूसि तोडी ।
षडरिपु गृह मोडी, ऊघडी मोक्षशाळा ।
जयजय गुरु पूर्णानंद-स्वामी दयाळा ॥ ५ ॥
पूर्णानंद सरस्वती गुरु सदा, विश्रांतिचीं साउली ।
पूर्णानंद पतीतपावन जना, मोक्षाचि ही माउली ॥
पूर्णानंद प्रसन्नमूर्ति अवनीं, या लोचनीं पाहिली ।
पूर्णानंद सुवर्ण अक्षरपदीं, पुष्पांजुळी वाहिली ॥ ६ ॥
मौनावांचुनि सत्वबुद्धि हृदयीं, आफाट ती वाटती ।
मौनेंची अपरोक्ष दृष्टिस पडे, मोक्षाचि ही वाट तीं ॥

मौनेंची तुटती विकल्प घटतीं, नाना घटाच्याऽपदा[1] ।
मौनेंची प्रणिपात यास्तव बरा, श्रीसद्गुरूच्या पदा ॥ ७ ॥
मौनेंचि देह पुरुषोत्तमरूप होतो ।
मौनेंचि शीव बनतो, जिवची अहो तो ।
मौनेंचि सत्य जपणें, जप मालिकेला ।
मौनेंचि श्रीगुरुपदीं, प्रणिपात केला ॥ ८ ॥
मौनेंची घडतें गुरुस्तवनहीं, नित्याक्षरीं बोलणें,
मौनेंची घडतें निवांत असनीं, बैसोनियां चालणें ॥
मौनेंची गुण गावयासि धरिला, ज्या मस्तकीं हस्तक ।
मौनेंची कर जोडुनी गुरुपदीं, तो ठेविला मस्तक ॥९॥
ब्रह्मानंद पदींच चित्सुख असे, देती श्रुती साक्ष हीं ।
ब्रह्मानंद पदारविंद स्मरतां, येतो करीं मोक्षही ।
ब्रह्मानंपदीं सरस्वति नदी, तापी सिता नर्मदा ।
ब्रह्मानंद पदारविंद हृदयीं, राहो सदा सर्वदा ॥ १० ॥
स्वामी चिन्मय आद्यशिष्य सहजा, नंदाख्य श्रीगोचर ।
ब्रह्मानंद विदेहि पावन तुकारामाख्य आगोचर ॥
पूर्णानंद सरस्वतीसह तिन्ही, त्रैमूर्ति दत्तात्रय ।
तोडी ही त्रिपुटी त्रिवेणिसरिता संसार-तापत्रय ॥ ११ ॥

**आर्या**–( गीति )

राहो अशीच तुमची, परि आठासम उणी न वाचा हो ।
येतो सदा समानचि, अंक जसा दरगुणीं नवाचा हो ॥१२॥

---

१ शरीरें.

कमदिढी चढे, ये मदावरी ।
फिरुन आपुल्या, ही पदावरी ।
धरि वसूपरी शृंग अंबरीं ।
सम नवाचिया नम्रता बरी ॥ १३ ॥

नित्यानंदें केला, नारायणरूप मानवी काय ।
नारायणासि देणें, नारायण ऊपमा नवी काय ॥ १४ ॥
नित्यानंद प्रसादें, उमजे क्षेत्रज्ञ क्षेत्र अणिकां न ।
श्रमती पाहतां योगी, झांकुनि दृढ वक्त्रनेत्र आणि कान ॥१५॥

## १४३ श्लोक

झाली प्राप्त यथार्थ पेनशनही, केली परी नोकरी ।
बाबा, सावध व्हा, स्वहीत अपुलें, साधावया लौकरी ॥
साधू-संग धरा समग्र अटपा, संसार-रामायण ।
विष्णुस्वामि ह्मणे अतां तरि ह्मणा, निर्वाणिं नारायण ॥१५॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

श्रीसद्गुरू विष्णुदासांचे मठांत आरती व भजनानंतर खालील श्लोक ह्मणून प्रार्थना करण्याचा सांप्रदाय आहे:—

पतीत ह्मणुनी अलों, पतितपावना शंकरा ॥
कृतार्थ मजला करा, सकळ गूण रत्नाकरा ॥
ललाट पट फीरवा, पडळ मायेचें आवरा ।
नमामि उनकेश्वराख्य गिरिजावरा ईश्वरा ॥ १ ॥

उदंड गमली तुझी, क्षितिहुनी क्षमा आगळी ।
ह्मणूनि अवलंबुनी, पडलों जन्मदेच्या गळीं ।
कसाहि खळ मी असो, परि नको उपेक्षूं मला ।
जगज्जननि रेणुके ! सकळ लाज माझी तुला ॥ २ ॥

तुलाचि तुजसारखें, जननि नांव हें शोभलें ।
समान जगिं पाहसी, जड मुढादि ज्ञानी भले ।
उदंड मज सारखे, पतित तारिले कौतुकें ।
ह्मणूनि तुजला अलों, शरण मी आई रेणुके ॥ ३ ॥

अंबे ! तुलाचि ह्मणतात दिनाचि आई ।
सांभाळ वेदश्रुतिच्या, वचनास बाई ।
नाहीं भि दीनजननी, अशिमात्र वाणी ।
काढूनियां करुं नको, करुणेसि वाणी ॥ ४ ॥

नाहीं दया आलि बया, तुज सारखीला ।
येईल काय सखये, दुसऱ्या सखीला ।
द्वारीं तुझ्याचि मरणें, निर्धार केला ।
जाणार नाहिं तुज सोडुनि द्वारकेला ॥ ५ ॥

तारो या भवसागरांत अथवा, मारो करो आपदा ।
अन्याला परि जाइना शरण मीं, सोडूनि त्यांच्या पदा ।
सिंहाद्रीवरिजी अखंड जगदोद्धारावया राहिली ।
श्रीदत्तात्रय तो गुरू परम ती, श्रीरेणुका माउली ॥६॥

— ॐ —

श्रीविष्णुदास महाराजांनी पत्नीनिधनोत्तर 'आई खरच ग' केलेलें पद पूर्वखंडांत छापलें आहे. या पदा बरोबरच खालील श्लोक तयार झाले आहेत. त्यांत जनस्वभावाचें सुंदर चित्र रेखाटलें आहे हें श्लोक वांचून ध्यानांत येईल.

## १४४ श्लोक (शिखरिणी).

तुझ्यासाठीं शास्त्रा, सहित शिकलों गायनकला ।
जगामाजीं केल्या, त्यजुनि भय वेव्हार नकला ।
तुझ्यापायीं माझा, अजवर पहा देह झिजला ।
अहा कांते ! कांते ! अझुनि तरि तूं सोड मजला ॥ १ ॥
मला कर्षीलें जों, वरि रवि ह्मणे मी उजडलों ।
जरा भ्यालों नाहीं, जननिजनकाला बिघडलों ॥
तुझ्यासाठीं केला, नुतन खडिचा उंच मजला ॥ अहा. २ ॥
कशाला एकांतीं, ह्मणासि रतिचें घ्या सुख चला ।
पहा तारुण्याचा, भर उतरला जोर खचला ॥
प्रपंचाच्या भारें, श्रमुनि जिव हा स्वस्थ निजला ॥ अहा. ३ ॥
जरी ताडी नाकीं, पद तरि न सोडी खर खरी ।
तशा कर्मे आली, गत अशि वयाला खरखरी ॥
फजीतीचा धंदा, विषय मतिमंदा समजला ॥ अहा ४ ॥
न सोसे दुःखाची, मज जड शिळा साच रडलों ।
पहा श्रीविष्णूच्या, पदताळें बळीसा चिरडलों ।
न यावें स्वप्नीं त्वां, ह्मणुनचि विनंती हि तुजला ॥ अहा. ५॥

तुझा मी तूं माझ्या, सम उतरुनी आलिस कशी ।
भवाग्नीच्या कुंडीं, ढकलुनि मला गेलिस कशी ॥
परत्राचा रस्ता, मजविण कसा गे उमजला ॥ अहा० ६॥
अह्मी आत्मध्यानीं, बसुनि दृढ झालों निबरची ।
नको मारूं आतां, उगि हृदयिं घालून बरची ॥
यमाजीचा माथां, धडधड नगारा गरजला ॥ अहा०७॥
कधीं नाहीं गेलों, तरि जपतपालागिं विजनीं ।
रमानाथाच्याहीं, क्षणहि रमलों नाहिं भजनीं ।
कधीं नाहीं भावें, हरहर ! महादेव पुजिला ॥ अहा० ८॥
सदा चिंताग्नीचे, बसति शरिरीं तत चटके ।
ह्मणोनी गायीले, नित अनुभवें सत चुटके ॥
करो विष्णूदासा, वरि हरि कृपेचा गरजला ॥
अह्वा कांते ! कांते ! अझुनि तरि तूं सोड मजला ॥ ९ ॥
ॐ ! ॐ ! ! ॐ ! ! !

कवितेच्या पहिल्या खंडांत पुरवणी विभागांत ' श्रीमातापुरवासिनी भगवती चिंतामणी शारदा ' ह्या अष्टकाचीं ८ कडवीं छापलीं आहेत. त्यानंतर खालील कडवीं उपलब्ध झालीं आहेत.

( शा. वि. )

ऐसा पातकि शंकराहि न मिळे, भावार्थ याचा मना ।
नाहीं पालटलें त्रिविक्रमरुपें, जें नाम तें वामना ॥
माझा त्याग करील क्षारचि तुझ्या, सत्कीर्तिच्या सिंधुला ।
श्रीअंबे, जय रेणुके, जननिगे, कां राग आला तुला ॥९॥

आनाथा प्रतिपाळिसी म्हणुनियां तूं नाथ नारायणी ।
श्री व्यासात्रिशुकादिनारदमुनी, गाताति पारायणी ॥
विष्णूदास म्हणे तरी त्यजुं नये, पीतांबरें तंतुला ।
श्री अंबे, जय रेणुके, जननिगे, कां राग आला तुला ॥१०॥
ॐ । ॐ ।। ॐ ।।।

## १४५ श्लोक.

भ्रांतीनें भ्रमलों उदंड श्रमलों तापत्रयें तापलों ।
विश्रांतिस्तव देश पट्टण वनें धुंडोनि संतापलों ॥
चिंताक्रांत उपोषिताहि गमली विश्रांतिची साउली ।
भिक्षांदेहि यतिप्रती अनसुये दत्तात्रये माउली ॥ १ ॥
श्रीगीतामृत दे नराप्रति वदे श्रीदेवकीनंदन ।
श्रीगीताश्रुति माउली ताशि दुजी देईल आनंद न
श्रीगीताश्रित पातकी नर कधीं जन्मेल ना जन्मला ॥
श्रीगीते निजभक्ति ज्ञान वर दे माते नुपेक्षी मला ॥

## १४६ आरती.

( चाल—आरती ज्ञानराजा )

जयजय गुरुमूर्ती । पुरुषोत्तम सरस्वति ।
ओंकारूं महाराजा । जित्रशिवात्मज्योति ॥ जयजय० धृ. ॥
तुझे गुण-अनुवाद । गातां चारिही वेद ।
म्हणती नेति नेति । मनीं पावूनि खेद ॥ जय० १ ॥
आदिमध्य आणि अंत । रहित तूं अनंत ।
जाणती ब्रह्मज्ञानी । स्वानुभवीक संत ॥ जय० २ ॥

रेणुका आदिमाया । पदीं वाहूनि काया ।
स्वरुपीं लीन होसी । केलें ' चरित्र ' गाया ॥ जय० ३ ॥
देहांति केली लीला । शिरिं सिंहनाद केला ।
दाविली मोक्ष-वाट । बहु आनंद झाला ॥ जय० ४ ॥
विनवी ' गुरुदास ' । माझें तुझ्या पदास ।
अखंड रत व्हावें । मन न हो उदास ॥ जय० ५ ॥
ॐ । ॐ ।। ॐ ।।।

श्रीविष्णुदासाची कविता खंड १ ला पृ. १५३ ते १५६ यांत रावजीशास्त्री यांनीं लिहिलेलें पत्र छापलें आहे, पण तें अपुरें आहे. पृ. १५५ तील आर्या २४ नंतर खालील आर्या वाचाव्या:—

## १४७ आर्या (गीति).

सर्व घटीं परमात्मा, येकाचि परि नये उपासनेला हो ।
श्रीरामरूप धरुनी, कृष्णे मारुति गृहास नेलाहो ॥ २५ ॥
बहुविध गुण रूपरंगी, जिवनकला माय रेणुका ही हो ।
या सुखसगिते वांचुनि, न रुचे मज सार रेणु कांहीं हो ॥ २६ ॥
करुणावंते माझी, करुणा तुझिया मनांत येऊं दे ।
तिजुच्या लक्ष हं केला, आई ! तूं येकवेळ तरि 'वो' दे ॥२७॥

पृ. १५६ आर्या ११ नंतर खालील आर्या वाचाव्या.

देइल अरुची गुरुची, वाणी गुळ घृत हतांत कांकणकीं ।
नवरत्न मुद्रिकेहुनि, साजे सतिच्या हतांत कांकण कीं ॥१२॥

श्रीमंत्र यंत्र तंत्र न, या त्रय सोडी असूत्रकारास ।
परि रंगिं नाचवावें, उचितचि गुरुराज सूत्रकारास ॥ १३ ॥
मूर्खाप्रति मूर्खाचा, द्यावा दृष्टांत कार्कि काकाचा ।
मोठे अइ बापाचा, तो होइल काय काकि काकाचा ॥ १४ ॥
हृदयांतरिं पाझर हा, ओला होईल काय हो बोला ।
मुळपिठ रंगीरंगा, शिणली धरिला ह्मणून आबोला ॥ १५ ॥
अइपण त्यजिलें अइनें, गुरुपण त्यजिलें जरी गुरूगुरुनें ।
तरि मीपण मी माझें, सोडित नाहीं ह्मणून गुरगुरु ने ॥१६॥
मोडिनें मीपण जेव्हां, मी तेव्हां मग तुह्मीन राहाल ।
तुमच्या चरणासाठीं, होतिल होवोत या नरा हाल ॥ १७ ॥
सगुणामृत सेवावें, निर्गुण निरधर्म काय चाटावें ।
आहं सोहं गर्भी, भक्ति सुखाचे उपाय आटावे ॥ १८ ॥
चंद्रवदन मृगलोचन, नामें बहु खास दान मोत्याचें ।
जो गुण रत्न हें दाविल, चरणानंदें सदा नमो त्याचे ॥१९॥
होइन पावन येइन, श्रीसग्दुरु सदनिं दर्शनाला हो ।
नमनें सहज.चि येइल, तत्वमसी पद निदर्शनाला हो ॥२०॥
श्रीगुरु दर्शनमात्रें, तरतिल पापिष्ठ हे असें काय ? ।
विष्णूदास म्हणे तरि, बोलावें क्लिष्ट हें असें काय ॥ २१ ॥
या चट पटक्या फटक्या, आर्या अव्यंग व्यंग चाळीस ।
निजसेवेसी सजवुनि, ध्या येखाद्या तरी गचाळीस ॥ २२ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

---

१।२ फार उत्कृष्ट तत्वपर आर्या. विवेक दृष्टिनें वाचल्यास उच्चदर्जाचें समाधान वाटेल.

## १४८ प्रार्थना श्लोक

करशिल जलवृष्टी, तुष्टिपुष्टी असों दे
सुखमय करि सृष्टी, दुःख दृष्टीं नसों दे
हरि—हर—परमेष्ठी, पृष्ठिं रक्षोत मागें
जयजय जय वंदे, मातरं—मातरं गे १
हराशिल भय चिंता, संकटें माउली तूं
करिशिल स्वकरांची, सर्वदा साउली तूं
म्हणवुन गुण गायीं, विष्णुस्वामी अभंगे
जयजय जय वंदे, मातरं—मातरं गे २

( वसंतति. )

शक्ती असो जग—हितास्तव अंगिं बाकी
यावीण कांहिं नलगे, मजलागिं बाकी
हे विष्णुदास विनवी, मृगराज—यानी
तूं येकवेळ तरि दर्शन दे भवानी ३

ॐ । ॐ ।। ॐ ।।।

बोल भवानी की जय
श्री दत्त महाराजकी जय ।।
श्री सद्गुरुनाथार्पणमस्तु

( श्री विष्णुकवि महाराज यांचे बंधु संतवर्य
श्रीगुरुदास महाराज यांची आरती.

१५९ आरती ( भुवन सुंदराची चाल )

आरति श्रीगुरुदासाची । परात्पर गुरुवर चरणाची ॥धृ०॥
महिमा सद्गुरुरायाचा । वदाया दुर्बळ ही वाचा ॥
परंतु प्रेमोदधिवरती । सुरुर्मी सहजचि सरसरती ॥
चाल-दयाब्धे श्रीसद्गुरुनाथा । चरणरजशिरीं,
धरुनि बहूपरी । स्तवूं अंतरीं ।
चरण महिमान, सदा ज्याची । उन्मनी वृत्ति प्रेमळाची ॥
आरती० ॥ १ ॥
शुकासारखें ब्रह्मचर्य । निरंतर घडे धर्म कार्य ॥
सोवळी परी कर्मवार्ता । पतित पातक्यांस उद्धरता ॥
चाल-अहर्निशी अनाथांस दाता । ज्ञानदानास ।
निपुटुनि आस । वासनावास, जुरे तिळमात्र कृपा
ज्याची । परम कोमला अंतराची ॥ आरती० ॥ २ ॥
दृष्टि कोवळी कशी वर्णू । कल्पना काय व्यर्थ ताणू ॥
सुधाघन जणु करुणामूर्ति । वरुषला करुणामृत वरती ॥
चाल-सुखानें तनुमनांतरंग । सुटे भवसंग ।
भक्तिचा रंग । चढे मग दंग ।
नावरे वृत्ति अंतराची । पदीं पांगळी होय साची ॥आ०३॥
जगूं शोभला शंभुमूर्ति । शांति वैराग्य अंगकांति ॥
लाभली जया पादगंगा । मुक्ति झोंबली तया अंगा ॥

चाल—शिष्य परिवार वसिष्ठाचा । जणूं सेवेस ।

अहर्निशि वास । शिरीं चरणांस ।

धरुनि पदकमलिं वृत्ति ज्यांची । सदोदित लीन तन्मयाची ॥

आरती ॥ ४ ॥

घडो सर्वदा पादसेवा । हीच मागणी देवदेवा ॥

पामरा पादयुग्म दावा । निरंतर तिथें वास द्यावा ॥

चाल—वास दूसरी अंतरंगीं । नसे माउले,

काय पाउले । नेणती भले ।

ऐक सोज्वळे हाक याची । रुक्मिणी-तनय अंतराची ॥

आरती ॥ ५ ॥

ॐ । ॐ ।। ॐ ।।।



## १५० आरती श्रीभार्गवानंदाची

( चाल-सदर )

भार्गवानंद गुरूराया ! आरती ओवाळूं सदया ॥ धृ० ॥
श्री पुरुषोत्तम गुरु चरणीं । रतला भृंग जसा नलिनीं ॥ बहू-विध दृढसेवा करुनी । जाहला मान्य सर्व भुवनीं ॥ चाल-नराचा नारायण झाला । परी सेवाचें, गुरूची साची, परि न वर याची । किती वानु मी तुझ्या विनया ॥आर० ॥१॥
रेणुका मातेची सेवा । अपूर्ण राहिली कीं तेव्हां । ती ते पूर्ण करायाला । भार्गवरामाचे अवतरला ॥ चाल-शिष्य समुदायीं बहु शोभे । अमरीं कीं इंद्र, नागीं नागेंद्र, उडुगणी चंद्र, उद्धरी जन या कालि समया ॥ आरती० ॥ २ ॥ काम क्रोध दास होती ! नामें मदमत्सर पळती । लोभ मोहाची तीच गती । जीवन्मुक्तची तो जगतीं ॥ चाल-प्रेमें वासुदेव चरणीं । करितसे नमन, प्रपंचीं न मन, विषय तें वमन, वाटे झाली गुरूचि दया, आरती ओवाळुं सदया ॥ आरती० ॥ ३ ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!



# श्रीपुरुषोत्तमाश्रम, श्रीक्षेत्र माहूर.

माहूर येथें हा आश्रम ब्र. श्री. प. प. पुरुषोत्तमानंद सरस्वति उर्फ विष्णुदास कवि यांनी स्थापन केला आहे. याक्षेत्रीं येणाऱ्या यात्रेकरांस या आश्रमांत उतरण्याची उत्तम सोय झाली आहे. येथून मातृतीर्थ जवळ असून श्री रेणुकादेवीही नजीक आहे व श्रीदत्त शिखरावर जाण्यास येथून जवळ पडतें. येथें धर्मशाळा झाली आहे. आणखीही इमारती होणार आहेत. यात्रस्थांनी या आश्रमाचा लाभ अवश्य घ्यावा.

**औषधीय शाखा:**—श्रीविष्णुदास महाराज यांचेजवळ दिव्यौषधी असत. त्या औषधांचें बाड गुरुभक्त ज्ञानेश्वर व्यंकटेश जिल्हेवार रा० जवळें; ता० दारव्हा; जि० यवतमाळ या वैद्यास दिलें आहे. हल्लीं त्यांनी श्रीविष्णुकवि प्रासादिक औषधालय काढलें आहे; त्याचाही फायदा गरजूंनी घ्यावा. औषधें फार गुणकारी आहेत.